॥ ॐ कालायतस्मै नमः ॥

संगीत

# सोन्याचा धूर!

( देव-धर्म क्रांतिकारक वाङ्मयात्मक नाटक )

—: लेखक :—

विठ्ठल नारायण कोठीवाले, पुणें.

पुरस्कार

श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य डॉ० कुर्तकोटी

करवीर पीठ

—×—

प्रथमावृत्ति

—×—

१९३६

—×—

किंमत एक रुपया

ॐ

**श्रीमज्जगद्गुरू श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी**

**करवीर पीठ**

सांप्रत वास्तव्य, गंगापूर, श्रीक्षेत्र नाशिक–पंचवटी.



॥ श्रीपादयुगुलार्पणमस्तु ॥

वैशाख शु. ३ "अक्षय्य"
शके १८९८

श्रीचरणांकित,
—दुर्गेशनंदन–पुणें.

बालोद्यान प्रेस, पुणें.

॥ श्री ॥

## श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी

यांनीं ता० १०-१०-३५ रोजीं रात्रौ १० वाजतां

सोलापूर नूतन संगीत नाटकगृहांत प्रथम प्रयोगाचे वेळीं

अध्यक्षपदारूढ होऊन श्रींनीं

# दिलेला निर्णय



श्रींनीं आपल्या भाषणांत प्रस्तुत नाटकांतील अनेक धार्मिक बाबींचा गौरवपूर्ण उल्लेख करून " शांतरस हा या नाटकाचा आत्मा असल्याचे सांगितले व परिणाम-सातत्य हा त्याचा सद्गुण आहे, असें मत दिलें. धर्मपर नाटकें, अद्याप आपल्याला पाह्यची संवय झालेली नाहीं ! " प्रबोध चंद्रिका " हें नाटक अशाच प्रकारचें असून तें एका संन्याशानें लिहिलेलें आहे ! मी या समारंभाकरितां मुद्दाम असा जो उपस्थित झालों, तों केवळ धर्मसंस्कृतीच्या तळमळीकरितांच होय ! अशा प्रकारें मुद्दाम लांबून येण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग आहे !

प्रस्तुत नाटकांवर पुष्कळच बोलण्यासारखें आहे; परंतु अजून तिसरा अंक व्हावयाचा आहे. तरी पण तिसरा अंक ग्रंथकर्त्याकडून दुपारींच वाचून घेतला असल्यानें कर्त्याचा उद्देश व रोख मी दृष्टीपुढें ठेवूनच संस्थेच्या चाल-

कांना एकदोन सूचना करीत आहे. पुस्तक प्रकाशित झाल्यानंतर सदरहू नाटकावर मी अन्यत्र लिहिणारच आहे. आजच्या या नाटकांतील सर्वच भूमिका प्रत्येकानें आपापल्यापरी फारच समजून केल्या आहेत आणि त्याचा योग्य तोच परिणाम आपणां सर्वांच्या मनांवर झालेला आहे! " पुजाऱ्यांचा त्रास " व "सकेशा ब्राह्मण स्त्रियांचा मंदिरप्रवेश " या बाबत सोलापूरकरांना ताजाच अनुभव असल्यानें तो मी अधिक सांगूं इच्छित नाहीं. वैदिक धर्माचा पुरस्कार करणारे विधर्मी पात्र कर्नल इन्स्टीट्-हे लेखकाच्या पाहण्यातले असून, त्याचेंच प्रतिबिंब त्यांनीं या नाटकांत दिग्दर्शीत केलें आहे! तेव्हां चालकांनीं अशा प्रकारचीं नाटकें, इंग्लंड, अमेरिका या देशांत जर दाखविण्याचें धाडस केलें तर लंडनमध्यें वैदिक धर्म-पीठाची स्थापना करण्याची माझी जी महत्त्वाकांक्षा आहे तिला मूर्तस्वरूप प्रस्तुत नाटकानें येईल आणि वैदिक धर्माची ध्वजा दिगंत फडकत राहून साहाजिकच अशा नाटकाचें कौतुक झाल्याशिवाय राहणार नाहीं!"



# अञ्जन !

**नाहीं तरी तुज कोण हें पुसते। निराकारी तेथें एकाएकीं ॥**

**--तुकाराम.**

**॥ माझ्या नेत्रीं विश्व समावें । ईश्वर निर्मीं मी निज भावें ॥**
**॥ निर्गुण-सगुणादिक देखावे । कल्पुनि कौतुक मीच करी ॥**

**—न. चिं. केळकर.**

**या** माझ्या देव-धर्म-क्रांतिकारक नाट्य—कृतीचा जन्म, गेल्यावर्षी तिसऱ्यानदां पुनरुज्जीवित झालेल्या "किर्लोस्कर संगीत मण्डळी" करितां म्हणून झालेला होता ! परंतु प्रस्तुत कलाकृतीचा उदय मात्र त्या आद्य नाट्यसंस्थेकडून तिच्या क्षणैक जीवितामुळें न होतां तो आज "प्रभात संगीत मंडळी" कडून झालेला आहे ! आणि हा दुवा जोडण्याचें श्रेय माझे मित्र सुप्रसिद्ध साहित्यिक व "महाराष्ट्र-कुंटुब-माले" चे संपादक **श्री. ना. वि. कुलकर्णी** यांनांच आहे. किंबहुना त्यांनीं जर उठावणी घेतली नसती तर सदरहू नाटकाला, **श्रीमज्जगद्गुरू श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी** यांचेंकडून जो पुरस्कार केला गेला तो कदाचित् झाला नसतां ! आणि म्हणूनच या समाज धर्म-क्रांतिकारक कलाकृतीला, आज जें हें महत्पद लाभलेलें आहे, तें मात्र कोणीहि पण माझा हेवाच करावा इतक्या भाग्यशाली वैभवाचा मान मला या नाटकानें मिळाला आहे ! तेव्हां श्रीकडून पुरस्कृत झालेल्या या नाट्य-कृतीची पार्श्वभूमि, माझ्या दारुण दैव दुर्विलासांतील एका बाळपणच्या प्रसंगांत होती. तो प्रसंग असाः—

इ. स. १९१४ साल. अवर्षणानें आणि त्यावेळच्या अवांतर राजकीय भानगडीनें पण मिळून महर्गतेनें, आपलें स्वरुप महाराष्ट्रांत चांगलेंच पालटून ठेविलें होतें ! त्यांतच सातारा जिल्हाहि पण होता ! सध्यांचे सरकारचे फडणीस नामदार **खा. ब. कूपर** ह्यांनीं परोपकारबुद्धीनें त्यावेळीं आंतबट्याचा व्यापार करून, रंगूनचे तांदुळ आणि लाखाची डाळ सातारमापी १०।१२ चिपट्यांनीं विकून त्या काळांत सातारा शहर व त्याच्या अस-

आवडीनुसार देवांचा बडिवार, वेद-पुराणवर्णित म्हणून सुरूं करीत राहातो ! अथवा अवतारीत देवांच्या आवडी-निवडी पाहूनहि पण तो आपल्या सगुणोपासनेचें सुकाणूं वल्हवीत राहतो ! त्यामुळें बऱ्याच देवादिकांचे सोपस्कार अगर कुळाचार त्यांच्या भक्तगणांच्या लहरीवरच चालत असतात ! अर्थात् त्यांत भक्तीचा ओलावा नसतोच असें मात्र म्हणतां येणार नाहीं ! तथापि त्यांत भक्तीचा उमाळा किंवा जिव्हाळा उतूं जात असतो असेंहि पण प्रतिपादितां येणार नाहीं ! तर सामान्यतः आपली देशकालपरिस्थिति, रीतिरिवाज, सांपत्तिकस्थिति आणि आपली बौद्धिक उन्नत्ति, ह्या सर्व बाबींचा विचार करूनच मानवी देह सगुणोपासनेचा म्हणजे मूर्तीपूजेचा सोहळा थाटत असतो ! साहाजिकच त्यामुळें स्वतःला आवड असलेल्या सर्व ऐश्वर्योपभोगक वस्तूंचें जडजोखड, तो सगुणोपासनेचा आधार घेऊन देवांवर लादूं पाहातो ! मग त्यांत मूलभूत देवांच्या संबयी, भक्तांच्या खिसगणतींत देखील येत नाहींत, इतके ते अंधश्रद्धाशील उत्तरोत्तर बनत जातात; आणि त्याचाच परिणाम मूर्तिपूजेचा अतिरेक आणि सगुणोपासनेचें विडंबन होण्यात फारच होतें ! बसवेश्वरी बाजारबसव्या आणि मणी मल्ल-मर्दन करणाऱ्या खंडेरायाच्या मुरळ्या, हें याचें प्रमाण असून, देवांच्या नांवावर वैश्यागारांत हिंदू पोरीबाळींचा भरणा करणें ही निव्वळ धर्माची चेष्टा होय ! !

आमच्या हातून जसजसा सगुणोपासनेचा अतिरेक होऊं लागला, तसतसा विधर्मीयांनीं आमच्या देवसाधनांचा हव्वातस्सा उपभोग घ्यायला सुरवात केलेली आहे ! ज्या शतकांत सधन देवालयांची वाढ झाली, त्या शतकापासूनच परधर्मीयांनीं आक्रमण करून देवालयांचीं आपार संपत्ति लुटून नेली ! किंबहुना याच कारणाकरितां मुसलमानांच्या साऱ्या स्वाऱ्या झाल्या आहेत ! एकटा सोरटी सोमनाथच काय पण तुळजापूरची भवानी, पंढरीचा विठोबा वगैरे आणखी कितीतरी देव लुबाडून, ठिकरीसारखे माळरानावर ते फेंकले गेले आहेत ! सारांश, देव-धर्म संस्थेकरितां मानवीप्राणी, कितपत अधो, गतीला पोहोंचतो आणि कसे रक्ताचे पाट धर्माच्या नांवाखालीं वाहवीतो, हें दिसून येईल ! अस्तु !

मुख्य मुद्दा हा कीं, आपल्या "देव-साधनांची धूळधाण" आज सुधा-

रलेल्या विसाव्या शतकाला देखील करण्याची दुष्ट खोड अद्याप गेली नाहीं! प्रतापगडची भवानी लंकेची पार्वती होतेंय न होतें तोंच पुण्याच्या पर्वती वरील मूर्ति सपशेल लंबायमान झाल्या ! हा "सोन्याचा धूर" असाच जर अजून डोळ्यावर राहिला तर विसाव्या शतकाच्या अखेरीस आज विद्यमान असलेल्या सधन देवालयांपैकीं एखादं तरी भावी काळ पाहील कीं नाहीं असा संशय आल्याविना राहात नाहीं ! कारण, धर्मांच्या नांवावर जोंपर्यंत "मूर्तिपूजन" आणि "मूर्ति-भंजन" सुरू आहे, तोंपर्यंत देव-द्रव्याचा पूर, तेलाधूपावारीच सांडणार. त्याला अवरोध कोण करणार ! सगळ्याच देवाज्ञा नि सर्वांच्याच धर्माज्ञा! देवधर्म-विरहित मानव प्राण्याची उत्पात्ति, सृष्टिला मुळींच मान्य नाहीं ! अर्थात् देव धर्म आणि मानव या कक्षेंत ज्या ज्या धार्मिक आणि व्यावहारिक बाजू असतील त्या त्या सर्व जमेस धरून मी या विषयाची सांगड, सुशिक्षितांच्या बेकारीशीं घालून दिली आहे ! सारांश, सधन देवालयांत निव्वळ कुजून सडत असलेल्या धनाचा-म्हणजे देव-द्रव्याचा व देवसाधनांचा,- योग्य विनियोग करून सुशिक्षित बेकारांकरितां मोठ्य प्रमाणावर कारखानें अगर तत्सम औद्योगिक संस्था जर काढण्यांत आल्या, तर त्या त्या देवस्थानच्या द्रव्याचा योग विनियोग होईल व बऱ्हंशी तरी बेकारी कमी होईल अशी माझी प्रामाणिक समजूत आहे ! यद्यपि जगाला आज अव्यवहार्य अशी वाटेल, पण हीच अखेर काळाकडून त्याला कळणार आहे ! सध्यां मी मात्र त्याला तोंड पाडलें आहे तें एवढ्याच करितां कीं, याबाबत नामदार **दि. ब. कंबळी** यांनीं आपलें "देवस्थान नियंत्रण बिल" नुकतेंच तयार केलें असल्यानें, प्रस्तुत विषयाचें अव्यवहार्य रूप, कांहींसें व्यवहारांत नि संपूर्ण सत्यांत जर लोकांपुढें आलें, तर देवधर्म संस्थेच्या अंतर्गत कारभारांत जो अनागोंदी खाक्या चाललेला आहे, तो लोकानिदर्शनास यावा आणि एवढ्याचकरितां सध्यां माझा अधिकार नसतांहि मी हा विषय नाट्यरूपानें जगापुढें आणण्याचें धाडस केलें आहे ! वास्तविक हा विषय मी म्हातारपणींच घेऊन लिहिणार होतों; परंतु तो बेत वरील कारणानें आज फिरवावा लागला. तेव्हां देव-धर्म संपुष्टांतला हा वर्ण्य विषय जितपत मला निर्दोष राखतां येईल तितपत तो मी केला आहे; अर्थात् हें ठरविण्याचें

काम जरी सहृदय वाचक-प्रेक्षकांचें असलें तरीपण त्याबाबत माझें स्वतःचें मनोविश्लेषण आगाऊ त्यांना कळविणें अत्यंत अगत्याचें आहे.

देवधर्माच्या अनुषंगिक असणारे बरेच विषय मी या कथासूत्रांत एकत्र गुंफून मुख्य विषयाला चालना अवघ्या सात आठ भूमिकेंत दिली आहे. देव–देवळांचीं दृष्यें प्रत्यक्ष रंगभूमीवर दाखविण्याचें धाडस मी मुद्दाम होऊन टाळलें आहे. याचें कारण असें कीं, देवधर्मविषयक ही बाब मानवीस्वभावांत प्रखरतेनें भावनाशील बनून सुप्तच राहात असत्ये ! तिला धक्का देणें अशक्य होय. नाहींपेक्षां, देवळांचा विध्वंस करून रंगभूमिवर आगी लावणें वगैरे प्रकार मी सहज केलें असतें! परंतु कोणत्याही धर्म-पीठाला, मताला, संस्कृतीला, जातिधर्माला अगर वेदवाक्याला यत्किंचित्हि पण बाध न आणतां, प्रस्तुत नाटकाचें स्वरूप " शांत नि अद्भुत " रसात्मक झालेलें आढळून येईल ! कालनिर्णयाच्या बाबतींत महिना सव्वा महिना खर्ची घातला असून, अखिल भारतवर्षावर पसरलेली सधन देवालयांची अगणित संपत्ति आणि रूढिरूढ धर्माचीं बंधनें ही जमेकडे एकत्र करून एक काल्पनिक "देवस्थान" निर्माण केलें आहे ! आणि तद्वारां सबंध हिंदुस्थानां-तल्या देवस्थानांचें वाद व घोटाळे रूपकात्मक म्हणून शिल्लकेंत काढलें आहेत ! उदाहरणार्थ " सकेशा ब्राह्मण स्त्रियांचा मंदिरप्रवेश. " हा प्रचलित वाद, फक्त एक पंढरपुराव्यतिरिक्त इतर कोणत्याहि पण देव-स्थानांत नाहीं ! बाकींच्या दर्शविलेल्या घडामोडी ह्या थोड्या फार फरकानें विद्यमान सधन देवालयांत प्रत्यही होतच आहेत; अर्थात् ह्या सर्व धार्मिक बाजूंचा विचार करूनच त्याला सोईस्कर अशी नाट्य–तंत्राची आंखणी मी माझ्या मगदुराप्रमाणें केली आहे ! अभ्यासूंनीं नीट मनन पूर्वक तपा-सून पाहवी म्हणजे त्यांतील इंगित तेव्हांच लक्षांत येईल ! केवळ छुमकुला–छुमकुल्यांच्या चार चटोर गोष्टींच्या वाचना अगर लिखाणा पलीकडे ज्यांची फारशी धांव नसेल अशांनीं प्रस्तुत पुस्तक पांच पन्नास वेळां जरी वाचलें तरी पण त्यांना यांतील " तत्त्व अगर नाट्यतंत्र " समजणें दुरा-पास्त आहे ! सदरहू नाटकाची बाब, ही विचारी ज्ञानवंतांच्या आटोक्यांत असून, विकारी अज्ञान मंडळीच्या मात्र बुद्धिशक्तीच्या आंवाक्याबाहेरची ती झाली आहे ! सबब त्याला माझा नाईलाज आहे !

भूमिकांचें स्वभाव रेखन त्या त्या पात्राच्या दर्जानुरुप व परिस्थित्यु-नुरुप केलें असून, एकूण सात भूमिकेंतील पांच पात्रें, हीं माझ्या दुर्दै-वाशीं निगडीत आहेत ! आणि म्हणूनच त्यांचें स्वभाव चित्रण इतरांनीं ठरविणें जरा कठीण आहे ! बटोबा हा सत्यसृष्टींत वावरणारा एक नराधम नीच मनुष्य आहे ! तेव्हां त्याच्या स्वभावाचें आविष्करण म्हणजे भिक्षुक-शाहीचें घाण दर्शन, असा मात्र कृपा करून कोणीहि आपला ग्रह निष्का-रण करून घेऊं नये. तर जन्मजात ब्राह्मण कुलांत जसा बटोबासारखा कालिपुरुष जन्माला येतो, तसा अन्य धर्मीयांत कर्नल इन्स्टीटसारखा श्रद्धा-शील धर्मात्मा जन्म घेत असतो ! वयपरत्वें दोघांचें कार्य एकच; पण मनोरचना मात्र भिन्न असल्यानें केवळ हा परस्पर विरोध मला आवर्जून दर्शवावा लागला ! यांत " चेष्टा " अगर "सूड" साधून मला आपल्या हीन मनोवृत्तीचें घाणेरडें प्रदर्शन मुळींच दाखवावयाचें नाहीं ! तथापि, हातीं आलेलें पात्र तसेंच सोडणें बरें नव्हे; कदाचित् अशानें दिवसेंदिवस अनाचाराच्या खोल गर्तेत रुतत जाणाऱ्या माझ्या ब्राह्मण समाजाला मीं हें दाखविलेलें बटोबाचें पिशाच्च पाहून तरी सदाचरणाचा मार्ग कायम आखतां येईल, केवळ याच सदिच्छेनें मला हा ज्ञातिद्रोह जाणून बुजून करावा लागला ! आणि या पातकाचें परिमार्जन म्हणूनच, मी माझें सारें धर्म प्रेम कर्नलसाहेबांच्या तोंडून परस्पर वदविलें आहे ! कित्येकांना तें कानटोंचणी करणाऱ्या सोनाराप्रमाणें दिसेल; तरी पण मुख्य भूमिका सत्य आहे ! आणि या भूमिकेकडून वदविलेलें कित्येक आर्य धर्मविषयक गोड विचार, हें मी महाराष्ट्र कवि संत चरित्र मालेचें इंग्रजी लेखक, कै० **डॉ. जस्टिन ई. ॲबट** यांनीं वेळोवेळीं आपले सहकारी कै० पंडित नरहर रामचंद्र गोडबोले, यांना लिहिलेल्या पत्रांतून घेतलें आहेत ! तसेंच **प्रो. राधाकृष्णन्** ह्यांच्या Hindu View of life, चा आणि " हिंदु धर्माचीं मूलतत्त्वें म्हणून त्याचाच अनुवाद करणारे धुळ्याचे श्री. **बाळु-भाई मेहता** M. A. LL. B. यांनीं आपल्या पुस्तकांत दिलेल्या स्वतंत्र टीपा, यांचा मी अगदीं सढळपणें या भूमिकेकरितां म्हणून उपयोग करून घेतला आहे ! कारण प्रस्तुत नाटकाचें जडजंबाळी स्वरुप पाहातां माझ्या सध्यांच्या तुटपुंज्या ज्ञानाला असें केल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें ! असो !

नाटकाचा गद्यपद्य भाग हा विषयानुरुप साजून दिसण्याचा मी कल्पनातींत प्रयत्न केलेला आहे ! दुसऱ्या अंकाच्या सुरवातीला इंदिरेच्या तोंडीं असलेलें ' भावगीत ' मी कुठं तरी कुणी गुणगुणलेलें ऐकिलें असल्यानें तेंच उद्धृत करण्याचा मला मोह झाला ! त्याचा कर्ता मला माहीत नसल्यामुळें हा उल्लेख करावा लागला. तसेंच, नाटकाच्या नांवासंबंधींहि पण तर्कटें लढविण्याचा मोह, कित्येक माझ्या शब्दब्रह्म मित्रांनीं केलेला आहे ! श्री. मामा वरेरकर यांनीं " कळस " केला म्हणून कोठीवाल्यांनीं " धूर " काढला—! परंतु त्यांना मी एवढेंच विनम्रभावानें विनंति करतों कीं, सदरहू पुस्तक त्यांनीं आतां मुद्दाम वाचावें, म्हणजे त्यांना आपली कोटी परत घ्यावी लागेल. माझें नांव हें " द्व्यर्थी " असून, त्या त्या वेळी अर्थ आपोआपच विशद होत गेला आहे, हें सुज्ञ वाचकांच्या तेव्हांच लक्षांत येईल ! पूर्वीचें " धर्मलांछन " हें नांव बदलण्याचें कारण म्हणजे मी या नाटकांत एकतंत्री नाट्य—लिखाणाचा स्वीकार करून, नाट्यसंस्थेच्या सोईकरितां थोडयाशा भूमिकेंत उठावणी केली—! आणि दुसरें असें कीं,माझ्या रक्तबंबाळ "छेडलेल्या छाव्या" नंतर, " अद्भुत पण शांत रसात्मक" अशी जर एखादी तात्त्विक नाट्यकृति निर्माण केली तर ती कितपत यशस्वी होईल, हेंच मी अजमावून पाहात असतां नाटकाचा जसजसा लेखनकाल समीप येऊ लागला, तसतसा दुसऱ्या अंकाच्या शेवटीं त्याच पूर्णविराम होऊन तिसऱ्या अंकांत पुन्हा प्रश्न चिन्ह विषयाच्या माथ्यावर चढलेले दिसून येईल ! रंगभूमि ही एक प्रयोग शाळाच मी मानित असल्यानें, निरनिराळे विषय घेऊन तिची सेवा करणें, हें माझें व्रत आहे आणि विविध विषयानें आज विद्यमान असलेल्या सर्व नाटक कंपन्यांचें कार्यक्षेत्र ज्यांच्या त्यांच्या दर्जानुरूप व्यापून टाकण्याचा माझा मनःसंकल्प झालेला आहे ! लोकाभिरुचि पाहून नाटकें लिहिण्यापेक्षां, नवीन लोकाभिरुचि निर्माण करणें, हें प्रत्येक नाटककाराचें आद्यकर्तव्य आहे ! कारण, नाट्य हें वाङ्मय आहे ! आणि वाङ्मय हें केव्हांही झालें तरी उच्च दर्जाच्या लोकांच्याच हातीं राहणार ! केवळ अलुते—बलुते नाटकाला येऊन गेले काय आणि न आले काय सारखेंच ! म्हणून तर नित्शे छातीठोकपणें म्हणतों कीं, " **कलेचा उगम**

थिएटरांत नसतो ! " तेव्हां या सर्व अडी-अडचणी लक्षांत घेऊन, मीं हा अव्यवहार्य विषय यथामति चित्रित करण्याचा पण सत्यसृष्टींत मात्र लोकांच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न केलेला आहे ! आणि त्याचें कोड-कौतुक रंगभूमीवर आल्यापासून ठिकठिकाणीं जें लोकांनीं केलें आहे तें पाहून याबद्दल मला व्यक्तिधर्माप्रमाणें आनंदच झाला आहे ! तथापि एका अप्रिय गोष्टीचा उल्लेख करून तिचें निराकरण करणें जरूर आहे ! " माळ्याचा मका आणि कोल्ह्यांचीं भांडणें " असा प्रकार सध्यां मराठी रंगभूमीवर फार बोकाळला आहे ! आणि याचें बलवत्तर कारण म्हणज कित्येक शहाणेसुर्ते नाटककार, सध्यां रखेली पेशानें व्रती म्हणून एकाच कंपनीच्या मखरांत बसूं पाहात आहेत. त्यांनीं अमळ विचार करून पाहावा कीं, यांत आपला,–नाट्यसंस्थेचा–लोकांचा आणि शेवटीं कलेचा उपमर्द करीत आहोंत ! तीच ती भाषा,–त्याच त्या कल्पना–तेंच ते नट वगैरे सर्व कांहीं तेंच तें असल्यानें, नवीन मंडळींना ( मला नव्हे ! ! ) नाटक लिहिण्यापेक्षां तें लिहून रंगभूमीवर आणणें फारच प्रयासाचें होतें ! किंबहुना अशक्यच होतें ! माझ्या मतें रंगभूमीची अवनतस्थिति व्हावयाला हें एक मुख्य कारण आहे. मला असाच एक प्राणी मांजराप्रमाणें आडवा गेला! तो आतां किमया करून "धुरांतून सोनें" निर्माण करण्याच्या प्रयत्नांत आहे ! परंतु मी हें प्रांजळपणेंच कबूल करतों,–नव्हे आग्रह धरतों कीं,–प्रस्तुत विषयावर जेवढीं म्हणून आज नाटकें या माझ्या मराठी रंगभूमीला लाभतील, तेवढीं तीं हवींच आहेत ! मग इषेंवजा हमरी तुमरी कशाला ! मार्ग मोकळा आहे. साधन मिळण्याजोगें आहे ! मग दिरंगाई कां करावी ? एवंच, आतां कोणीहि कशापासून सोनें निर्माण करो; मूळ सोन्याचा धूरकर्ता म्हणून रंगभूमीवर पहिला मानाचा मुजरा मीच धर्मदेवतेला साक्ष ठेवून केलेला आहे ! आणि तो रसग्राही विद्वान् रसिक मंडळींना मान्य होईल असा मला पक्का आत्मविश्वास आहे !

" शास्त्रें फार अपार, जीवित तुझें अत्यल्प कीं मानवा " असा एक श्लोक आहे ! नानाविधशास्त्रांत पारंगतता मिळविणाऱ्या आपल्या पूर्वजांच्या आध्यात्मिक जीवनाचा जर इतिहास पाहिला तर, जें तत्त्वज्ञान त्यांनीं झाडांच्या आश्रयाला राहून कंदमूळांचें सेवन करीत मिळविलें; तेंच

ज्ञान आम्हांला आतां सातां समुद्रापलिकडचें पारखें होऊन बसलें आहे ! हिंदभू तत्त्वज्ञानाला मुळींच महाग नसतां, सध्यां तें आम्हांला मात्र विलायती विलासी वातावरणांत मिळवावें लागतें. विलासांत सौख्य आणि त्यागांत समाधान, यापरतें मनुष्य प्राण्याला काय हवें असतें ! त्याची सारी धडपड एवढ्याच करितां असल्यानें सुखदुःखांचीं द्वंद्वें, त्यांत अहर्निश होत असतात इतकेंच !

प्रिय वाचकवृंद ! काल मायेच्या तडाक्यांत माझ्या मातेवर देवकंदन करण्याचा प्रसंग जर आला नसतां किंवा माझ्या वाड-वडिलांनीं एखादें साधे देऊळ जरी कमावून ठेविलें असतें तर, हें नाटक मी लिहितों ना ! पण ज्याअर्थी स्वतःच्या कर्मकहाणींतलाच हा विषय होऊन बसला त्याअर्थी ईश्वरी नेमानेमच असा असावा कीं, या चालू काळाला, देवधर्मसंस्थेबाबतचा स्पष्ट इषारा द्यायला म्हणून कुणी तरी एक माझ्यासारखा निमित्तमात्र जन्मायला हवा होता ! आणि जिथें या माझ्या नाट्यकृतीला, " श्रीमज्जगद्गुरूंचा " अनुग्रह व कृपाआशीर्वाद लाभला तिथें हें खरें असावें, असें वाटतें ! वेड्याबगड्या जगाच्या दृष्टीनें, माझ्या देवभोळ्या आईची कृति जरा चमत्कारिक दिसेल ! देव ठेंचला, त्यापेक्षां म्हातारीनें ही कार्टी विहीरींत टाकून जीव कां दिला नाहीं, म्हणूनहि कोणी पृच्छा करील ! पण प्रयोगावस्थेंतून पूर्णावस्थेकडे जाऊं पाहणाऱ्या या सध्यांच्या उत्क्रांतिपर जगाला मात्र, आदर्श म्हणूनच ती यावश्चन्द्रदिवाकरौ राहून अमर राहील ! तात्पर्य प्रस्तुत नाटकाच्या बरें वाईटपणाबद्दल जर कुणी कुणाला जबाबदार म्हणून खेंचायचें असेल तर तें धूर्त काळालाच खेंचावें लागेल ! कारण, त्याचें स्वरूपच मूळ सर्वभक्षक आहे ! असो !

सदरहू नाटकाचा प्रथम प्रयोग गुरुवार ता. १०।१०।३५ रोजीं सोलापूर येथें नूतन संगीत थिएटरांत रात्रौ १० वाजतां **श्रीमज्जगद्गुरु श्री शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी** यांचें हस्तें झाला ! श्रींचा लाभ हा केवळ " नवसाहित्यिक संघ " सोलापूर व इतर " सन्मान्य नागरिक " यांच्या सहाय्यानेंच झाल्यामुळें मी आणि माझी प्रभात संगीत मंडळी या झालेल्या धर्मऋणांत आनंद मानून आम्हीं सर्वांचें आभार मानीत आहोंत.

त्यांतल्या त्यांत **रा. ब. रामचंद्र हणमंत पागे, व दे. भ. रामभाऊ राजवाडे** यांचें झालेलें साह्य यावज्जन्म मी व प्रभात संस्था विसरणें अशक्य आहे ! तसेंच आम्हीं हा सोन्याचा धूरकाढीत असतां, ज्या ज्या कित्येक आमच्या विरोधक मित्रांनीं संधि साधून आमची चांदी आटविण्याचा मूर्खपणा केला त्या त्या सर्वांची आम्हीं कींवच करीत आहोंत.

नाटक रंगभूमीवर सुरू होऊन आज सहा महिन्यानंतर प्रस्तुत पुस्तक बाहेर पडत आहे ! पुस्तकाच्या बाबतींत पुण्यांत जशी मला " चाण्डाळ ग्रही " आड आली, तशीच ती प्रयोगाच्या बाबतही " दशग्रही "च म्हणून पालटली ! कळत न कळत कां होईना पण याची बाधा प्रभात सं. ला झाल्यानें तिनें माझा या बाबत जाणूनबुजून अन्याय केलेला आहे ! तरी पण झालेल्या तीन प्रयोगावरून माझें उद्दिष्ट कार्य मला झाल्यासारखें वाटलें !—आणि " नाटकाचें भवितव्य " आणि "विचारांचें वातावरण" पुण्यास सर्व वृत्तपत्रांनीं एकमुखीं मान्य करून या सार्वजनिक विषयाला प्रसिद्धी दिली याबद्दल त्या त्या पत्राचा मी व्यक्तिशः फार आभारीच आहें. आणि म्हणून तर मी प्रकाशनाच्या बाबतींत अगदीं निर्भय होतों. वस्तुतः हीहि बाब मला सार्वजनिक वाटत असल्यानें, माझा थोडा फार अनुभव जातां जातां नमूद करून ठेवावासा वाटतो ! जे खरोखरींच प्रकाशनाचा धंदा म्हणून करणारे कांहीं सद्‌गृहस्थ आहेत, त्यांनीं मला स्वच्छ परिस्थितीनें ' नकार '. तर एकदोघांशीं माझा व्यवहार पटला नाहीं ! आणि त्यांच्याबद्दल मला कांहीं बोलावयाचें नाहीं; परंतु अलिकडे कांहीं काड्या—बांगडयाच्या गोष्टीपलीकडे ज्या कुड-मुडया जोश्यांचें फारसें ज्ञान नाहीं अशी माझी मित्रमंडळी साहित्यसेवेचा आंव आणून सध्या प्रकाशन संस्थेंत पुण्या-मुंबईस काम करीत आहेत ! वाङ्मयाच्या दृष्टीनें त्यांची दृष्टि " एकांगी " बनली असून अशांची वाढ होणें म्हणजे साहित्यक्षेत्राला लागू पाहाणारी वाळवी होय ! सरस्वती मंदि-दाराला ही कीड,—अर्धवट लेखक आणि अर्धवट अंधारी प्रकाशक म्हण-विणारे साहित्यिक भुंगेच लावीत आहेत ! महाराष्ट्र शारदेच्या शरीरावर उमटूं पाहाणारा हा त्वचारोग वेळींच दक्षता घेऊन जर पारोसा थुंक्यानें

घालविला नाहीं तर, उद्यां तिचें सर्वांग घाण—सडवून ठेविल्याशिवाय राहणार नाहीं ! माझ्या बाबत मी नवीन प्रकाशन निर्माण करूं शकलों. इतरांची कुचंबणा ज्याची त्याला माहित ! असो !

पुस्तकांत आणि प्रयोगांत तास दीड तासाचें अंतर आहे ! कारण, नाटक तात्त्विक असल्यानें, त्यांतील तत्वज्ञानविषयक भाषणें कमी करून प्रयोगाचें मनोरंजकत्व कायम ठेवलें आहे ! कर्नल इन्स्टीटची भाषा, नाविन्य म्हणून रंगभूमीवर बदललेली आहे ! "त" ऐवजीं "ट" "द" ऐवजीं "ड" एकूण थोडीशी जडच-हेलवजा केली आहे आणि असें करण्याचें कारण म्हणजे माझ्या एका वृद्ध रेव्हरंड ज्यू इसमानें एकदां हे उद्गार काढले कीं, "वाणी ही शुद्ध ब्राह्मणांचीच ! आणि म्हणून तर वेदाध्ययनाचा हक्क इतरांपेक्षां तो ब्राह्मणांनीं अद्यापपर्यंत बजाविला असून, आपली वाणी "अस्खलित" ठेविली आहे !"—अर्थात् वाणीधर्मविचार लक्षांत घेऊनच हा बदल केला आहे ! आणि रंगभूमीवर तो नाविन्यपूर्ण असाच रंगलेला दिसतो ! अलिकडील नाटकांतल्या पदांत "राम" नसतो असें म्हणणाऱ्यांनीं प्रस्तुत नाटकांतील पद्यभाग अत्यंत कसोशीनें पाहावा अशी मी विनंति करतों !

शेवटीं माझा "हृद्रोग" लक्षांत घेऊन माझे बाळपणचे स्नेही श्री. विश्वनाथ विनायक साठे, यांनीं थोडीशी कां होईना पण आर्थिक बाब पुढें केल्यामुळें आणि गणेश प्रिंटिंग प्रेसचे मालक श्री. गणेश काशिनाथ ऊर्फ तात्यासाहेब गोखले व बालोद्यान प्रेसचे मालक श्री. एस्. बी. सहस्रबुद्धे, यांनीं धंदेवाईकदृष्टी न ठेवितां कांहीं सोईस्कर सवलती दिल्यामुळें, सदरहू पुस्तक मला आज समाजापुढें ठेवितां आलें हा तरी सरस्वती मातेचा मीहि एक खराखुरा उपासक असल्याचा विजय जरी होत असला तरी पण या त्रैमूर्तींचें साहाय्य मला जर मिळतें ना, तर आज कांहीं हें पुस्तक वाचकांच्या हातीं मला देतां आलें नसतें ! सहृदय वाचक, पुस्तक प्रसिद्ध झालें म्हणजे त्याचें खरें बाळंतपण उरकलें असें म्हणतात. आणि एका अर्थी तें खरेंहि आहे ! नाटक लिहावयाला घेतल्यापासून, तें रंगभूमिवर येऊन पुस्तकरूपानें बाहेर पडेतोंपर्यंत काय काय अडी-अडचणी येतात, ही बाब किरकोळ नसून ती सार्वजनिक म्हणूनच मी येथें नमूद करून ठेविली आहे ! वाचकांना जरी त्याचें

महत्व वाटलें नाहीं, तरी पण रंगभूमीच्या इतिहासलेखकाला त्याची फार जरूरी आहे ! प्रत्येक नाटककारानें आपल्या नाटकाचा इतिहास-त्यांत आलेले बरे वाईट प्रसंग मुद्दाम होऊन लिहून ठेवावेत ! म्हणजे टीकाकार हा प्राणी फारसा बेताल होणार नाहीं ! निदान मी तरी या मताचा असल्यानें केवळ अनिच्छापूर्वक म्हणून हा सार्वजनिक इषारा देणें मी माझें कर्तव्य मानतों ! तें मी केलें असून आज हा विषय जसा हातावेगळा झाला, तसाच तो डोईवेगळाहि पण करीत आहें ! शेंकडा किती वाचक-प्रेक्षकाना माझीं मतें पटतील अशी मला कधीच जिज्ञासा उत्पन्न होत नाहीं ! किंबहुना संख्यावाढीवर अनुमानच बांधणें, हास्यास्पद होय! अर्थात् माझ्या वांट्याला उद्यां प्रसिद्धीचे पर्वत पडतील का “ निषेधाचे नगारे ” फुटतील हें ठरविण्याचें काम मी सर्वस्वी काळाकडे सोंपविलें असल्यानें त्याबाबत मौन धरणें एवढेंच आज माझ्या हातीं आहे !

वैशाख शुद्ध ३ “अक्षय्य”
रोज गुरुवार शके १८५८
ता. २३।४।३६

धर्माभ्यासक व देवसंरक्षक,
**वि. ना. कोठीवाले, पुणें.**
४०४-(२) सदाशिव, पुणें नं. २

---

## माझी साहित्य-सेवा !

### भाग १ ला.

[ टीकात्मक ]

श्री. खाडीलकरकृत ‘सवती-मत्सर’ व त्यावर कै. प्रो. शि. म. परांजपे यांनीं घेतलेल्या आक्षेपांचे खंडण-मंडण; दे. भ. बॅ. सावरकर कृत ‘सन्न्यस्त खड्ग’, दे. भ. तात्यासाहेब केळकर कृत ‘वीर-विडंबन’ व ‘भानुदास’, श्री. वि. स. खांडेकर कृत ‘रंकाचें-राज्य’ वगैरे दहा नाटकावरील उत्कृष्ट मल्लिनाथी टीकांचा संग्रह यांत केला असून शिवाय ‘माया-मच्छिंद्र’, ‘श्यामसुंदर’ इ. बोलपटावरील वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या विस्तृत परीक्षणांचा समावेश केलेला आहे !

पृ. सं. अदमासें ५०० वर; किंमत २॥ रु.

**लौकरच प्रसिद्ध होईल !**

## शमी-पत्र

शके १८५७ आश्विन शुद्ध विजया दशमीचा दिवस म्हणजे माझ्या आयुष्यांतील सुवर्ण संधि ! हिंदूंच्या धर्म-क्रांतीचें सीमोल्लंघन ठरवून मी हा सोन्याचा धूर काढीत असतां, माझ्या ह्या खालील मंडळींना विसरणें म्हणजे डोळ्यावर 'धूर' चढला असेंच तें ठरणार असल्यानें हें शमीपत्र! केवळ कृतज्ञतेच्या अश्रूंनें भिजवून ज्यांचें त्यास परत बोलीच्या पुनर्भेटी-दाखल म्हणूनच अर्पण करीत आहे !

**श्रीमज्जद्गुरु श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी**

**व**

## प्रभात संगीत मंडळी.

श्री. नारायण विनायक कुलकर्णी, श्री. विठुकाका खाडिलकर, नव साहित्यिक संघ, सोलापूर, श्री. रा. ब. रा. ह. पागे, श्री. दे. भ. गम-भाऊ राजवाडे, श्री. सिद्राम अप्पा मोहरे, श्री. यशवंत नरहर गोडबोले, श्री. भाऊ गंगाधर साठे (कॉन्ट्रॅक्टर), श्री. नारायण रामचंद्र जोशी, श्री. के. व्ही. जोशी, श्री. आत्माराम रावजी भट, श्री. पां. म. भागवत, श्री. एम्. एन्. छत्रे वकील, श्री. वाय्. एस्. साठे वकील, श्री. डी. बी. देवधर, मुंबई श्री. डॉ. एम्. आर. राव, सौ. मालती-माधव, श्री. न. का. ऊर्फ भैय्यासाहेब बावडेकर भोर, श्री. वैद्य पटवर्धनबंधु त्रिखाडी-कर, मि. ए. बी. सेटना वकील, म्यु. कौ. कँप पुणें व त्यांचे कारकून रा. यशवंत वामन लेले, श्री. डी. जी. पटवर्धन वकील व त्यांचे कारकून रा. सदाशिव गोविंद परांजपे, श्री. एन्. टी. भिडे, श्री. यशवंतराव गद्रे, श्री. व्ही. डी. बोरकर, श्री. कवि मनमोहन, श्री. यशवंत सिताराम जोशी, श्री. भा.रा.सहस्रबुद्धे श्री. न.रा.जोशी व महाराष्ट्रांतील वृत्तपत्रांचे संपादक.

**कर्ता**

# मुद्रण-मोहरा

प्रकाशक :

श्री. विश्वनाथ विनायक साठे, ठाणें.

—x—

मुद्रक :

श्री. गणेश काशिनाथ गोखले, मालक श्री गणेश प्रिंटिंग वर्क्स, पुणें.
व त्यांचा कामगार वर्ग.

—x—

ब्लॉक्स् व चित्रछपाई :

श्री. एस्. बी. सहस्त्रबुद्धे, मालक बालोद्यान कार्यालय, पुणें.

—x—

फोटोग्राफर्स :

श्री. साळगांवकर, ( सोलापूर ) फोटो. बाळकृष्ण-कंदन.
श्री. जी. एम्. शहा ( अहमदनगर ) बाकीचे सर्व फोटो.
श्री. राजे ( ठाणें ) प्रकाशक फोटो.

—x—

तीनरंगी चित्ररेखक :

श्री. आर्टिस्ट् आर. बी. केळकर ( अहमदनगर ).

—x—

श्रींचा ब्लॉक :

खास केसरी-संस्थेच्या उदार परवानगीवरून.

# सुवर्णदिन !

आर्य-धर्म-संस्कृतीच्या इतिहासांतील सोन्याचा दिवस म्हणजे गुरुवार ता० १०-१०-३५ रोजीं रात्रौ सोलापूर येथें श्री. सिद्रामअप्पा मोहरे यांच्या "नूतन संगीत नाटकगृहांत" **श्रीमज्जगद्गुरु श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी** यांच्या अध्यक्षतेखालीं **प्रभात संगीत मंडळीनें** सदरहू नाटकाचा प्रथम प्रयोग केला. त्यावेळीं खालील मंडळींनी आपापल्या केलेल्या भूमिकांचीं व त्यांचीं नांवें:—

| भूमिका | | नांव |
|---|---|---|
| एस्. बाळकृष्णन् | : | अभिनय-बालार्क मा. दत्ताराम |
| कर्नल इन्स्टीट् | : | श्री. प. वि. करमरकर |
| बटोबा पुजारी | : | श्री. मामा कागलकर |
| विश्वनाथ | : | श्री कृष्णराव नाथ (कवठेकर) |
| सी. आय्. डी. (इन्स्पेक्टर) | : | मा. नारायण जोगळेकर |
| वारणाक्का | : | मा. भाटवडेकर |
| इंदिरा | : | रूपसुंदर मा. गंगाराम |
| यल्ली | : | मा. भाऊ माळुसरे |
| हार्मोनियम | : | श्री. राजाराम महादेव करंबेळकर |
| तबला | : | मा. भानुदास गुरव |
| स्टेज मॅनेजर | : | श्री. गोपाळराव मेस्त्री |
| मॅनेजर | : | श्री. के. एम्. सुळे |
| प्रोप्रायटर | : | श्री. व्ही. डी. बोरकर |
| डायरेक्टर | : | श्री. वि. ना. कोठीवाले, पुणें |

---

# सोन्याचा धूर !



## स्तवन

यमन–त्रिताल.

वेद्-धर्म पहा दांभिका ।
निर्मळ करी आधीं पूज्य-भावना ॥
सुरांसि कुठवर ? देह-दंड हा ॥ ध्रृ० ॥
कुबेर भांडारी हा असतां ।
मूर्ति पूजनीं धन-नाश हो आतां ॥
" तत्त्वमासिला " सावधान व्हा ! ।
तत्त्व निवेदन नाट्य-मंदिरा ॥ १ ॥

—x—

# अंक १ ला.

—×—

## प्रवेश १ ला.

[ **स्थळः**—विश्वनाथाचें भाड्याचें घर. त्याची मातोश्री काढलेल्या बोट-वाती करीत पण कांहीं वेळानें देवदर्शनाला जायच्या विचारांत ! विश्वनाथाची तरुण गतभर्तृका बहीण इंदिरा, ही वाल्मिकी रामायणाचें वाचन संपवून पोथी आवरीत असलेली ! सर्वसाधारण ओसरीवरील गरिबींतलें दृष्य. ]

**वारणाक्काः**—इंदा ! बाळ, तूं कांहीं म्हण; पण आज तूं नेहमींप्रमाणं, पोथी नाहीं वाचलीस ! आणि राम–कौसल्या भेटीचा प्रसंग तर मला अर्थ न सांगतांच समजावून दिलास ! आज असं ग कां केलंस ! कां तुलाही अर्थ कळला नाहीं !

**इंदिराः**—( शांतपणें विचार करीत. ) आई, अर्थ हा मुकेपणांतच वावरतो, नाहीं !

**वारणाक्काः**—अग पण तूं तर त्याचा विचार आतां चांगलाच बोलून करत्येस कीं–!

**इंदिराः**—होय ! अस्तित्वानंतरच सापेक्ष विचार निर्विकार मनानं मनुष्य प्राण्यांनीं करायचे असतात ! आई, तूं नेहमीं म्हणत असलेल्या 'सीता–स्वयंवरांतलं' अगदीं शेवटलं कडवं कोणतं ग ! "राम जानकी मिळून आले, गुढ्यातोरणें घरोघरीं–" ! ( आठवित )–आणि पुढं–!

**वारणाक्काः**—अग पुढं, "राम कथामृत अमृत मेवा–" आणि मग "पक्कान्नामध्यें शिरापुरी–!"

**इंदिराः**—( दुःखपूर्ण दीर्घ सुस्कारा सोडीत. ) शिरापुरी–! आई, आतां तूंच पहा बरं कीं अन्नाचं "परब्रह्मपण" काय एकट्या त्या शिरापुरींतच सामावलं आहे ! मूळ गाण्याची पूर्तता, शिरापुरीच्या पक्वान्न-

शिवाय काय झालीच नसती ! म्हणजे अर्थाअर्थी त्या चरणांत कांहीं अर्थ उतरला आहे कां ! आणि म्हणूनच मी म्हणत्यें कीं, " अर्थ हा मुकेपणांतच वावरतो " !

**वारणाक्का:**—हं, आतां मला तुझ्या बोलण्याचा,—नाहीं विचारपूर्वक बोलण्याचा अर्थ समजला. अग पण मी तुला विचारला होतां या पोथींतल्या कथेचा अर्थ ! आणि तूं मात्र घेतलास त्याचा भलतांच अर्थ ! म्हणजे सांगणाऱ्या-ऐकणाऱ्यांमध्यें कधीं कधीं जो अर्थाचा अनर्थ होतो असं म्हणतात तो हा अस्सा ! इंदे, तूं अर्थ याचा अर्थ, पैसा असा घेतला असशील नाहीं ! बाकी सगळं जगच त्या अर्थाकरितां अनर्थी बनत चाललंय ! मग तूं जर तसा अर्थ—

**इंदिरा:**—बघ ! तूं देखील आत्तांच्या आत्तां हा शब्द आठ दहा वेळां बोलण्यांत आणलासच !

**वारणाक्का:**—अग आणखी लाख वेळां म्हणेन ! जळ्ळा नुसता बोलण्यानं जर तो घरांत येणार असेल, तर देवाकरितां केलेली जपाची माळ उद्यां पैशाच्या नांवानं त्याच्याहि पण गळ्यांत घालीन ! पण तो मेला मूर्तिमंत—

**इंदिरा:**—( मध्येंच ) दिसत नसूनहि पण तो सध्यां कित्येकांना दिसतोंय असंच ना !

**विश्वनाथ:**—( एकदम प्रवेश करून ) काय दिसतोय ? कुठं कांहीं विंचू कांटा निघाला आहे कीं काय !

**वारणाक्का:**—( हंसत पण कमरेला हात लावून ) घे ! विसूनं तर तुझ्या मोझ्या बोलण्याचा अगदीं निराळाच अर्थ घेतलान् ! ( जवळ जाऊन ) बच्या, बाळ ! भिऊं नकोस, विंचू नाहीं नि कांटा नाहीं,—

**इंदिरा:**—आणि आई ! भाऊला भिऊं नकोस म्हणून म्हणण्याइतकां कां,—

**विश्वनाथ:**—( मध्येंच )—नाहीं,—माझ्या अंगावर कांटा जरी उभारला नसला, तरी पण तुमच्या ह्या दोघींच्या संदिग्ध संभाषणानं मला हिंवाची हुडहुडी भरल्यासारखं मात्र झालंय ! कारण ही विश्वनाथाची

चंद्रमौळी झोंपडी– ! –अहाहा ! शाकारून देण्याइतका देखील आपला मालक माणूसकींत म्हणून राहिलेला नाहीं ! पोटाला टांच देऊन, नाहीं पोटांत कांटे भरून, वेळेवर जरी त्याला आपण भाडं चुकतं करीत आहोंत; तरी पण त्याला हें आपल्या वास्तूचं स्वरूप एखाद्या भाकड गाईच्या दुधासारखंच दिसतंय ! मी तर आतां म्युनिसिपालिटीला अर्ज देऊन पाडूनच टाकणार आहे म्हणा–

**वारणाक्का**: – ( घाबरून ) छे ! छे ! उगीच असं कांहीं आततायी-पणाचं कृत्य करूं नकोस बरं ! अरे, उद्यां आपल्यालाच धर्मशाळेंत वाऱ्यावर राह्यची पाळी येईल ना !

**विश्वनाथ**:—येईल ! आणि धर्मशाळेंत काय म्हणून ! आज एक मी बेकार असल्यामुळं, या खोपटांत जरी राहात असलों, तरी पण त्या पेन्शनर घरमालकाच्या प्रपंचाला दरमहा दोन रुपयांची कां होईना; पण भर देणारा सभ्य आणि व्यवहारी असा एक गरीब शेजारी आहे ! निदान शेजार–धर्माला स्मरून तरी त्यांनीं आपल्या या पडीक वास्तूची,–

**वारणाक्का**:—अरे, पण बब्या ! घरमालक तरी इथं काय करणार बरं ! नवीन बाधलं तरी दासबोधांत म्हटल्याप्रमाणं, " उंदीर म्हणती माझें घर, ढेंकूण म्हणती माझें घर–"

**विश्वनाथ**:—( त्रासून ) हो, खरं ! पण आई, उंदीर–ढेकणांकडून घरमालकांना कधींच आगाऊ घरभाडीं मिळत नसतात !

**इंदिरा**:—( मध्येंच ) पण आईनें तर दासबोध मुखोद्गत करून, घर-मालकांची बाजूं चांगलीच प्रतिज्ञेवर सांवरून धरली कीं नाहीं ! !

**वारणाक्का**:—नाहीं बरं ! चुकत्येस तूं ! अग, तुम्हां दोन जीवांकरितां तर हें माझं सारं आयुष्य आहे ! घरच्या कर्त्या माणसांची जबाबदारी,–

**इंदिरा**:—( तिरस्कारपूर्वक ) तुझ्या कुंकवाच्या कृष्णमूर्तीकडून पार पडत नाहीं ही आतां कर्मकहाणी इथं नको ! आई, कशाला आतां त्या आठवणी ! आमचे वडील असून अडचण, नि नसून खोळंबा–

**विश्वनाथ**:—( संत्रस्त होत ) माझी मात्र या विषयानं ओलंब्या-

सारखी मनःस्थिति होतेय ! जाऊं दे, इंदूताई ! हा विषय वाढवून, उगीच आतां जेवायचा खोळंबा करूं नकोस ! चल पाहूं जेवायला !

**वारणाक्का:**—हं, जा वाढ त्याला ! मी तुमचीं जेवणं होईतोंपर्यन्त, देवाच्या शेजारीला जाऊन येते.

**विश्वनाथः**—( साश्चर्य ) म्हणजे-! ! तूं अजून देवाला जाऊन आली नाहींस वाटतं !

**वारणाक्का:**—छे, रे ! आज पोथी वाचायला घेतल्यापासून किनई ही इंदु फारच अबोली झाली आहे ! तेव्हां म्हटलं इला एकटीला सोडून जाऊं नये हें बरं ! ( आत्मविश्वासपूर्वक ) बाकी, तशी ती विचारीच आहे म्हणा.

**विश्वनाथः**—( लाडांत पण उताविळपणें ) आणि आई मी ग !

**वारणाक्का:**—तूं तर चांगला मोठाच शहाणा आहेस !

**विश्वनाथः**—( धांदरटपणे ) पण विद्वान् गाढव नाहीं ना !

**वारणाक्का:**—ते मला कसं कळणार ! मी काय हिच्यासारखी " मायट्रीप "ची परिक्षा पास होऊन, शिकलेली थोडीच आहे ! ! बरं पण तुला आज एवढा उशीर कां लागला ! कांहीं कुठं उद्योगधंद्याचं,-

**विश्वनाथः**—( चिंताग्रस्त होत ) " उद्योगधंदा " ! अहाहा ! आई, खरोखरीच तूं माझी आई आहेस ! नोकरी म्हणजेच उद्योगधंदा, असा अर्थ घेण्याइतका गाढव, हा तुझा मुलगा मुळींच नाहीं ! स्वतंत्र-तेची आवड आणि स्वावलंबनाची निवड, उत्पन्न करण्याइतकी ताकद तूं मला " बाळकडू " म्हणून, लहानपणींच दिलेली आहेस ! अंगावर मातृपदाची जबाबदारी, व्यसनी जोडीदार जन्माचा निघाल्यावरहि, तूं आपल्या " श्रमोपजीवी " आयुष्यांत राहून, कर्तबगारीची दीक्षा मुलांना देण्याचा पितृपदाचा मान, बस्स ! तूंच एक पितृधर्माला गाडून खराखुरा मिळविला आहेस ! तेव्हां तुझाच हा मुलगा विसू ! आई, कुणी सांगावं ! पण ( गर्हिवरत ) तुझ्याच पायाच्या पुण्याईनं, उद्यां हीच आपली झोंपडी, कदाचित् अखिल भारतवासियांचं " उद्योगमंदिर " बनेल ! मात्र त्याला तुझ्याच आशीर्वादाची अपेक्षा आहे ! कारण,-

दुर्गा–त्रिताल

**जननी-पदां लोळण घे प्रभु । मानवी छंद सदा वाही ॥ धृ० ॥ दशावतारा, शांति-सुधीरा । तन-मन-धन मातें पाही ॥ १ ॥**

( आईला नमस्कार करतो. )

**वारणाक्काः**—बाळ पांचाचा पन्नास मिळवितां होऊन, लाखांचा पोशिंदा हो बरं ! ( म्हातारी जाते. )

**इंदिराः**—तथास्तु !

**विश्वनाथः**—( सानंद ) अहाहा ! या मातृइच्छेंतच माझ्या पुरुषार्थाची कर्तव्यपूर्ती जागृत आहे ! ( इंदिरेस ) बरं पण तूं आज अबोली झाली आहेस, असं जे आई मघाशीं बोलतां बोलतां बोलली तें कितपत खरं आहे !

**इंदिराः**—तुला तें कितपत समजावून घ्यायचं आहे !

**विश्वनाथः**—नसत्याला खरेपणाची शंका पटेतोंपर्यंत–!

**इंदिराः**—म्हणजे ! शून्य ब्रह्मांतून तें या दृष्य जगापर्यंत कां !

**विश्वनाथः**—हो ! दृश्य जगापर्यंत चालेल ! पण ताई, अदृष्याबद्दल दृश्य समजून, वादविवाद करण्याइतका मात्र, कुणी इथं मूर्खपणा करायचा नाहीं हो ! हो, अगोदरच आपला प्रश्न सोडवून ठेवलेला बरा !

**इंदिराः**—म्हणजे पुन्हा प्रश्न आलाच–!

**विश्वनाथः**—पण माझा अगोदरचाच पहिला प्रश्न, तुझ्याकडून कुठं सुटला आहे ! सांग ना ! तूं आज अशी अबोली कां !

**इंदिराः**—सांगूं ! तूं अलीकडे फार बोलघेवडा बनत चालला आहेस म्हणून ! अरे, नुसत्या बडबडण्यानं जर कांहीं लोककल्याण साधतां येत असतं तर तें बेडकानांहि पण साध्य झालं असतं ! मग पुरुषार्थाची कर्तव्यदेवता, " इच्छा-अनिच्छेंत "च गुदमरून मरती ना ! माफ कर, भाऊ ! तूं मला आतां कांहींच विचारूं नकोस ! चल, अगोदर जेवायला पाहूं ! दहाचा सुमार होत आला !—

**विश्वनाथः**—नाहीं—जेवायला आतां बारा वाजले तरी ऽऽ—! (हसून) बाकी दारिद्र्यांत राहून जेवणाऱ्या माणसांचे नेहमींच " बारा " वाजून, मरणाची वेळ, जेवणाच्या " अवेळीनं " टळत असत्ये, म्हणा. आणि म्हणून तर अंतकाळापेक्षां माध्यान्हकाळ—हा फार कठीण असतो—!

**इंदिराः**—पण तो कुणाला ? निरुद्योग्याला ? ! बोल, भाऊ ! तूं स्वतःला निरुद्योगी म्हणवून घ्यायला तयार आहेस कां ?

**विश्वनाथः**—असं तूं म्हणायला आधीं तयार आहेस कां ? सांग, इंदूताई ! मी तुला खरोखरीचाच निरुद्योगी बेकार वाटतो कां ? नाहीं ना ? ! पण मी स्वतःला मात्र एक चांगला पट्टीचा बेकार म्हणूनच समजतोंय ? बेकार म्हणवून घेण्यांत, मला अत्यंत अभिमानास्पद आनंद वाटतोय ! कारण, स्वतःच्या पोटाला पीळ पडत असतां साहजिकच दुसऱ्याच्या पोटाकडे समाधानानं पहावंसं वाटतं—! आणि मग असले आशाळभूत बेकारच, जगदुद्धारक पुण्यात्में बनून, विश्वाचे हितचिंतक या संज्ञेला पात्र होतात ! ताई, मी फारसा सुशिक्षित नसलों; तरी पण समंजस आहे ! तुला सध्यां " निरुद्योगी " जरी दिसत असलों; तथापि निरुद्योग्यानांहि मी उद्योगी बनविण्याच्या खटपटींत आहे ! सारांश,—

**इंदिराः**—तूं एक निरुद्योग्याचा उद्योगी माणूस आहेस ! सभ्य आहेस ! विद्वान् आहेस ! विचारी, बोलका आहेस ! झालं आतां ! पण भाऊ, अलिकडे आपल्याला या शिक्षणानं नुसनं बोलायला आणि सपाटून लिहायला मात्र, सडकून शिकवलं आहे ! आम्हांला फक्त " लिहायला—बोलायला " सांगा—

**विश्वनाथः**—आणि प्रत्यक्ष कांहीं करायला कुणी हात कां धरलाय ? नाहीं, ताई ! वेडी आहेस तूं ! अग करायच्या गोष्टीं येणाऱ्या काळानंच जरी कराव्या लागल्या तरी पण काळाला कलाटणी देणं, हें एखाद दुसऱ्या माणसाचं कार्य नव्हे ! फार कशाला ? आज आम्ही दुपारपासून, याच गोष्टींचा खल आमच्या मंडळांत करीत होतों,— !

**इंदिराः**—तुमचं " मण्डळ " म्हणजे— !

**विश्वनाथः**—आपलं " सुशिक्षित बेकारी निवारक मंडळ "—

**इंदिरा:**—अस्सं ! अस्सं ! म्हणजे तुम्ही बेकारींतले निवडक सुशिक्षित बेकार एकत्र होऊन " विचार-विनिमय " करीत होतां होय ? तर मग मंडळांतून पुन्हा पोटमंडळ ! त्यांतून पुन्हा कार्यकारी मंडळ आणि मग फिरून या सर्वांच्या नांवाच्या पाट्या ! प्रत्यक्ष कृतींत कार्याची जाहिरात दिसण्याऐवजीं जाहिरातीचं कार्य मात्र सध्यां घरोघर वारेमाप होऊन राहिलंय ! खरंच भाऊ ! घरोघर या मंडळाच्या पाट्या सध्यां इतक्या कांहीं लागल्या आहेत कीं, आतां धरणीकंपानं घरं पडायची म्हणून मग धास्तीच नको ! आणि मग असं जर झालं तर मग तुझ्यासारख्या सुशिक्षित बेकारांना उपाशीं राहून, तरी मरण कसं येणार ?

**विश्वनाथ:**—ताई, भलतीकडेच तूं हा विषय विनोदांत नेत आहेस बघ! अग तूर्त आपण मरायचा विचार बाजूला ठेवूं या! प्राण गेला तरी या विषयावर तुम्ही आम्ही चर्चा करायची नाहीं, हा आपला निश्चय ! चिरंजीवि अमरपट्टा घेऊनच, तुम्ही आम्ही जन्माला आलों आहोंत, याच विचारानं आतां प्रेरित होऊन आपण या प्रश्नाकडे लक्ष देऊं या ! कारण, मनुष्य प्राणी हा आशावादी आहे- !

**इंदिरा:**—आणि साक्षात् परमेश्वर तरी कुठं निराशावादी दिसतोय ? नाहींपेक्षां विभूति वर्णनाचं स्तोम माजवून देवाला अवतार कार्याच्या निमित्तानं कां वेळोवेळीं जन्म घेण्याचा मोह या पृथ्वीवर होता ? भाऊ-

**विश्वनाथ:**—( विनोदात्मक प्रोत्साहन देत ) हुंः ! चालूं दे पुढं-!

**इंदिरा:**—( हंसत ) बरं सांग पाहूं ? तूंच आता एकसारखा बोल ? मी नाहीं मधीं बोलत ! आतां तर झालं ? हं, मग कोणत्या गोष्टीचा खल केलास ? बोल कीं रे !

**विश्वनाथ:**—काय बोलायचं ताई ?

**इंदिरा:**—म्हणजे ? विचार केल्याशिवायच बोललास ? मग आतां आपण बोलून तरी विचार करूं या ?

**विश्वनाथ:**—ठीक आहे ? पण प्रथम अगोदर तूं गप्प रहा पाहूं ? हो मुकी ! झालीस ? ऐक आतां-

**इंदिरा:**—( मध्येंच ) पण मुकी झाल्ये तर मग ऐकूं येणार नाहीं ना ?

**विश्वनाथः**—नाहीं आलं तर मग बहिरी हो ! आतां कांहीं तुला पुनर्लग्न करायचं आहे थोडंच ? कां आहे विचार ?

**इंदिराः**—( वडीलपणा दाखवित. ) हं, तूं आपल्या मूळ विषयाकडे लक्ष दे पाहूं ! काय सांगणार आहेस ? सांग पाहूं नीट !

**विश्वनाथः**—हो ! तुला आपले बाळकृष्णपंत माहित आहेत ना ! त्यांचं आणि माझं आज एका अत्यंत महत्त्वाच्या मुद्यावर संभाषण होऊन एका नवीनच विचाराला चालना मिळाली ! म्हणजे तो विचार असा कीं, आपल्या लक्ष्मीनारायणाचीं जागोजागीं जीं ब्राह्मणांचीं "**अन्नछत्रं**" नि पांथस्थ साधू-बैराग्यांची "**सदावर्तें**" आहेत ना ! तीं ह्यापुढं सुशिक्षित बेकाराकरितांच कायम करावीत म्हणजे मूळ देवस्थानच्या उत्पन्नांत खर्च-वेच वजा जाऊन कांहीं तरी दुसरं निराळं नवीन उत्पन्न दिसूं लागेल ! आंगठे बहाद्दर गंजड नि भंगड मण्डळी दररोज पोट फुटेतोंपर्यंत जेऊं घालण्यापेक्षां जर माझ्या वर्गांतली सुशिक्षित बेकार मंडळी पोटभर एकत्र जेवलीं, तर त्यांचा उपयोग हमखास ह्या आपल्या देवस्थानला फार चांगल्यापैकीं होणारा आहे ! कारण, जेवणाच्या सोईवरच मनुष्याची बुद्धी कुशाग्र आणि कार्यप्रवीण होत असते !

**इंदिराः**—खरं आहे, भाऊ ! चल पाहूं अगोदर जेवायला ! वाटल्यास, जेवतां जेवतां आपण हा 'अव्यवहार्य विषय बोलूं— !

**विश्वनाथः**—( साश्चर्य ) म्हणजे, ताई ! तुला हा आमचा विषय अव्यवहार्य वाटला ! अग सकृद्दर्शनी तुझ्यासारख्या वरवर पाहणाऱ्यांना हा विषय अव्यवहार्य वाटेल कदाचित् ! परंतु विचारांतीं तो संपूर्ण विचारार्ह आहे, हें मात्र तुला मी हवं तेव्हां पटवून द्यायला माझी तयारी आहे ! बरं तर चल पाहूं ! अगोदर आपण आपलीं जेवणं उरकून घेऊं या. नाहीं तर आई आली म्हणजे—

( **पडद्यांतः**—कोण आहे घरांत ! ) कोण आहे दारांत !

[ इंदिरा आंत जाऊन दार उघडतें; तोंच एक टांगेवाला यल्ली नामक देवदासीसह प्रवेश करतो. ]

**टांगेवालाः**—रावसाब ! मला माफ करा. तुमच्या आईला बाईच

माज्या घोडयाचा धक्का लागूनश्यान, म्हातारीला जरासा मुका मार लागलाय बगा.

**विश्वनाथः**—( भीतिग्रस्त होत ) होय ! पण आतां माझी आई कुठंय बरं ! तूं तिला इथं कां आणली नाहींस ?

**यल्लीः**—घेवानं तिला डागदाराकडं दवाखान्यांत नेलीया !

**विश्वनाथः**—( साश्चर्य ) कोण देव !

**यल्लीः**—आपला बटोबा पुजारी नव्हं ! त्यो मला टांग्यांत घालूनश्यान घेवाच्या शेजारतीला नेत व्हता ! इक्त्यांत तुमची म्हातारी घोडयाम्होरं नजर बावचळून ठेंचळूनश्यान आडवी पडली आन् माज्या हातांतला ह्यो चांदीचा पंचामृताचा घेवाचा तांब्याबी लवंडला, नव्हं ?

( चांदीचा तांब्या एका कोंपऱ्यांत ठेवते. )

**विश्वनाथः**—( घाबरत )–पण माझ्या आईला फारसा मार तर लागलेला नाहीं ना ?

**टांगेवालाः**—नाय, रावसाब ! इक्तं घाबरायचं कांहीं कारन नाय बगा. अवो, घोडयाला अक्ष्शी माज्या बायकोवानी म्यां कह्यांत ठेवलंया, म्हून तर ह्यो आत्तांचा मोठा अपघात टळला बगा ! नाय तर ह्ये देवदासीच झेंगट, पुजाऱ्यांसह फरासखान्यांत न्येयाचा द्रोड वखुत आला व्हता ! बरं पन रावसाब, चला बसा टांग्यांत ! म्हातारीला घेऊन बिनधोक घरीं परत या ! आ ऽ थोडसं पायाला खरचटलंया ! बिब्बं हळदीचा लेप देऊन शेकलं म्हंजी बस्स !

**इंदिराः**—तें तूं नको आतां आम्हांला शिकवूस ! याबद्दल तुझाच अगोदर बंदोबस्त करण्याकरितां म्हणून, प्रथम मीच तुझ्याबरोबर पोलीस चौकीवर येते. कांहीं नशापाणी करून टांगा हांकतोस वाटतं ?

**टांगेवालाः**—( काकुळतीनं ) नाय जी ताईसाब ! अवो नशापाणी कराया धंदा हाय कुठं जोरांत ? हिची भन्हं ह्या फोर्ड मोटारीनं टांच मारलीया नव्हं आम्हां टांगेवाल्यांना ! बाईसाब, मला गरीबाला पोलीस चौकीवर नेऊनश्यान तुमास्नी काय भिळणार हो ? कायद्याखालीं दहापांच

रुपयांचा गंडा घालून दंड भरला तर त्येला कारन, पोलीस नाय व्हनार ! तर तुमच्यासारखी भली मानसंच त्येला जबाबदार राहत्याल बगा !

**विश्वनाथः**—खरंय तुझं म्हणणं बाबा ! आणि आमचं हें रंकाचें वैभव पाहूनच, तूं हे असं मघापासून फार तोंडसुख घेऊन राहिलाहेस नाहीं, कां !

**टांगेवालाः**—( हातापाया पडून ) रावसाब, मी तुमचं गरीब लेंकरूं हाय बगा. अवो, चार दोन रुपये तुम्ही घ्या; पन पोलीसाचा दंडुका, हातावर पोट असणाऱ्याच्या पोटावर नका मारूं धनी ! अवो तुमची म्हातारी, माज्याबी म्हातारीवानी आईच हाय बगा ! ( इंदिरेस ) आन् ताईसाब ! मी आतां तुमास्नी असं इचारतों कीं, घरामंदी तुम्हावानी चांगली तरुन मानसं असतां, घरांतल्या म्हाताऱ्या मानसाबरोबर जरा वाईच बाहेर हिंडाय-फिराया जाया काय व्हतं ! अं !–च्यिमन्हं दरोबस्त टांग्यांत तरुण जोडपीच हवा खायाला हिंडतात ! आन् मंग ही म्हातारी खोकडं खोंकात खोंकात देवदर्शनाला जाण्यापायीं रामराम म्हणत देवळं सोडूनश्यान् वाटेंतच राम म्हनत्यात नव्हं !

**विश्वनाथः**—हो ! असं सध्यां कांहींसं चालू आहे खरं ! एका अर्थी बरोबर आहे तुझं म्हणणं ! बरं पण, चल पाहूं अगोदर ! ( इंदिरेकडे वळून ) मी प्रथम आईला घेऊन घरीं येतों; तोंपर्यंत ही देवदासी तुझ्या सोबतीला राहील ! चलरे बुवा.

**टांगेवालाः**—( यल्लीस ) अग ए पोरी ! तें तुज्या टांग्यांतलं काय बारदान हाय तें सांभाळ आपलं ! चल हो म्होरं–!

**यल्लीः**—( भोळसरपणें ) दादा, बारदान नाय तें ! द्येवाच्या निवदाच्या लाडुकरंज्या हाय त्यांत !

**टांगेवालाः**—( वेडावित ) लाडुकरंज्या खायाला सवकली हाय ही चकली ! ऱ्या आईला काय मौज हाय बगा ! पुजाऱ्याचं प्रेम सपादलं, कीं द्येवाचा निवाद ह्या देवदासींना घरबसल्या टांग्यांतून घरीं पलंगावर येतुया ! हिची भन्हं धर्मावर पोसलेलीं हीं देवळं हाय, कां कर्मावर

माजलेलीं हीं कुटणीचीं-! जाऊं द्या ! कशाला उगीच आपण आपलं तोंड बाटवावं ! चला, रावसाब ! बसा टांग्यांत,—

[ इंदिरेखेरीज सर्व जातात. ]

**इंदिरा**:—आईच्या अपघातापेक्षांहि पण किती जबरदस्त आघात, बोलबोलतां या टांगेवाल्यानं आतां माझ्या मनावर केला पहा ! म्हणे तुम्ही तरुण माणसं घरीं बसतां-! भोळा बिचारा ! त्याला कुठून आमचा हा पांढरा विधिलेख दिसणार ! सकेशा विधवा स्त्रीला,-मग ती बाला असो, तरुणी असो किंवा वृद्ध होवो ! तिला मंदिरप्रवेश सरणावर सती गेल्याशिवाय वा वपनाचं विद्रुप सोंग सजविल्याशिवाय कसा होणार ! ! कौसल्येच्या कुंकुमतिलकानं मंडित झालेला रामदर्शनाचा प्रथम प्रसंग रामायणांत भगवान् वाल्मिकीनं काव्य म्हणून जरी चितारला असला; तरीपण आम्हां तरुण गतभर्तृकांच्या नशिबीं रूढीरूढ कल्पनेची रक्षाच लागत असते ! कारण, काव्यांतर्गत सत्य आणि रूढिरूढ आनंदाचा आस्वाद, ह्यांची अनादिकालापासूनच जणुंकाय या जगानं फारकत घेतलेली दिसते-!

कॉफी सिंदुरा—**एकताल**

**रूढिरूढ कां जग बनलें ? । गडे, रुचेना विधिला ॥**
**पाही मग शून्य-बलें ॥ धृ० ॥ वंचित विश्वास पुरा ।**
**काव्यांतरीं भ्रमवि खरा ॥ व्यवहारा नच थारा । कलि-**
**काळ बोले ॥ १ ॥**

[ यल्ली लाडु-करंज्यांचं बोचकं घेऊन येत्ये ] ये बाळ ! बैस अशी काय तुझं नांव ?

**यल्ली**:—माजं नांव यल्ली. मी मुक्ताम्मा बिन कल्लम्मा जोगतीनीची मुलगी.

**इंदिरा**:—आणि तुझ्या वडिलांचं नांव ग ?

**यल्ली**:—तें मी कसं सांगूं ! जोगतीणीच्या पोरांना द्येवाच्या नांवाइक्तंच बाप असत्याती म्हून ! म्हून तर आमचा बाप द्येव व्हतों !

**इंदिराः**—अस्सं ! बरं पण तुझं लग्न झालं असेलच ?

**यल्लीः**—व्हय ! माघल्याच आठवड्यात मला यल्लापूरच्या यल्लाम्माला दिली !

**इंदिराः**—( साश्चर्य व उत्कंठित होत ) म्हणजे काय केलं ग !

**यल्लीः**—वाहिली म्हनत्यात ! त्येचच नांव माजं लगीन झालं ! आई म्हनत्ये, तुजा नवरा " आई यल्लाई " हाय ! तर तिचाच यजमान तो बटोबा पुजारी आता मला नादी लावूनश्यान माझ्याजवळ रहा म्हनतुया. आईला सोडचिठ्ठी देऊन, लेकीला पोटगी देणारा जो आसल, त्यो आमचा नवरा व्हतो म्हून !

**इंदिराः**—म्हणजे ! बटोबा पुजारी कां तुझे वडील आहेत ?

**यल्लीः**—हां ! असं आई सांगते ! पण त्यो पुजारी बाबा तर बाशिंग बांधून माज्या म्होरं उभा राहया करतुया !

**इंदिरा**—बरं, तुझं शिक्षण वगैरे कांहीं ?

**यल्लीः**—लिंब नेसून नाचाया शिकली हाय वाईच ! डबड्यावानी तुणतुणंबी वाजवते कीं, हातांत कधीं मधीं घंटा धरून !

**इंदिराः**—बरं, तुला शिकायची इच्छा आहे कां ?

**यल्लीः**—मला तुम्ही शिकवाल कां ?

**इंदिराः**—हो ! तुला मी चांगली हुषार करीन !

**यल्लीः**—नाय, तशी मी येडी नाय ! वाईच जरा भोळी हाय बगा ! आन् म्हूनच कुनाची बी भीड मोडवत नाय बगा ! आतां ह्येच बगा, माज्या आईच्या भीडं करतां म्हून, त्या बटोबाकडं जानंयेनं करावं लागतं, नाय तर तश्शी मी कुठंबी, कुनीबी, कसंबी बोलावलं तर नायच जात !

**इंदिराः**—नाहींच जाऊं कुठं ! अगदीं जोगव्याला देखील तूं बाहेर पडतां कामा नये हं !

**यल्लीः**—तसं कसं म्हणतां ताईसाब ! अवो पोटापाण्याला तर बाहेर जावंच लागतं ! म्हंजी असं बगा कीं, बालभोग आनाया, रोज द्येवाची धूपार्ती डोळ्यानं पाहवी लागते ! आन् मंग या पुजाऱ्यांची कटकट दिस भरला कीं, सुरू व्हते ! बरं तर ताईसाब ! मी माज्या आईला इचारून,

जमलं तर उद्यांपासून शिकाया येत्ये ! पन मला चार सहा महिन्यांत बुकांतली चित्रं वाचाया याया व्हवी आं ! अवो, मला एवढ शिक्षाण देऊनश्यान, शाहणी तर करा; म्हंजी मंग बघते मी त्या बटोबाचा बटवा ! ( तिरस्कार ) ताईसाब, मला तर त्येला फायलं कीं,–

[ पडद्यांतः—यल्ले, ए यल्लाई–अग ए यल्लाम्मा ]

आला बगा बामण माज्या मागावर ! बघा तर खरं चितुर नुसतं दिसाया घोडंपिरावानी हाय !

**बटोबाः**—( पुजासाहित्यासह प्रवेश करून ) काय ग ए टिटवे ! इथं काय करतेस उभं राहून ! तिकडं तुझी आई जेवायची खोळंबली आहे ना ! चल ने त्या लवकर लाडुकरंज्या ! मोकळी मुदानी कुठली !

**यल्लीः**—( राग दर्शवित ) मंग ! द्येवालाच मला सरव्यानीं मोकळी सोडली हाय, नव्हं !

[ फक्त लाडुकरंज्याचं बोचकं तेवढं नेत्यें. देवाचा चांदीचा तांब्या मात्र विसरते. ]

**बटोबाः**—( इंदिरेस उद्देशून ) हं, आपल्या आईला घेऊन आतां इतक्यांत ते आपले,–कोण हो ते आपले विश्वनाथराव !

**इंदिराः**—ते माझे धाकटे सख्खे भाऊ आहेत !

**बटोबाः**—एकूण तुम्ही बहीण–भावंडं तर ! मला वाटलं कीं, नवरा-बायको असाल कदाचित् ! म्हणजे तुमचं अद्याप लग्न व्हायचं आहे तर ! ( देवाचा एक गुलाबी हार घेऊन ) घ्या हा देवाचा प्रसाद ! आंबाड्यांत घातला कीं, तो शिरसावंद्य म्हणून देवाचा मान राखल्यासारखाच आहे ! घ्या हा ! संकोच कसला करतां !

**इंदिराः**—नको मला ! मला त्याची आवड नाहीं फारशीं !

**बटोबाः**—फारशी नसेल ! थोडीशीं, किंचित् वासापुरती तरी असयचीच.

**इंदिराः**—शास्त्रीबुवा ! नका मला उगीच आग्रह करूं !

**बटोबाः**—छे बुवा ! अगदींच तुम्ही एखाद्या बालविधवेप्रमाणं अर-सिक अहांत ! ( न्याहाळून ) अरे खरंच कीं ! तुम्ही खऱ्याखुऱ्याच बाल-

विधवा अहांत तर ! मीच चुकलें ! तरी म्हटलं म्हातारी एकटीच कशी देवदर्शनाला येत्ये ! तर हें तुमचं असं आहे, नाहीं कां ? मग एकदां लवकर सोंवळं होऊन आईबरोबर देवदेव करावा कीं-! बाकी तुमची आई फारच भाविक बुवा ! थंडी-उन्हांतून,-पाण्या-पावसांतून-पण देवाला आल्याशिवाय नाहींच चैन पडत म्हातारीला ! कमालीची काटक नि परोपकाराला मात्र फुकट ! घरची अगदींच गरीबी दिसते ! तुमचा बाप म्हणे,—

**इंदिराः**—( रागानें ) शास्त्रीबुवा, फारच तुमची वृत्ति चौकसखोर दिसत्ये !

**बटोबाः**—( लोचटपणें ) तो आम्हां भटाभिक्षुकांचा उपजतच मनोधर्म आहे ! अहो, म्हणून तर सनातन धर्माचं संरक्षण होतंय ! नाहींपेक्षां आपल्याच या शिकल्या-सवरल्या ब्राह्मण मंडळींनीं,-

**इंदिराः**—हं, पुरें ! हें विचार " अर्घ्यस्थानी " म्हणणाऱ्यांचे खास नव्हेत.

**बटोबाः**—नाहींत कसें ? आहेतच मुळीं ! फार तर देवाच्या ताब्यांत तुम्ही धर्म आहे, असं म्हणाल; पण मुख्य देव तर आम्हां पुजाऱ्यांच्याच हातीं आहे ना ?

**इंदिराः**—बरं पण काय हो शास्त्रीबुवा ! तुम्ही कधीं देवाधर्माचा विचार केला आहे कां ?

**बटोबाः**—अलबत् ! आज पंधरा-वीस वर्षांत देवाची पूजा कीं एखादी आरती अद्याप नाहीं चुकविली मी ! हातांत जानव्याची ब्रह्मगांठ घेऊन देवाचीच शपथ घ्यायला तयार आहे ! एकवेळ संध्या चुकेल; पण देवपूजा लांबणारच !

**इंदिराः**—बरं पण मी तुम्हाला माझी एक शंका विचारूं कां ? शंका धार्मिकच आहे ! सांगा पाहूं, वपन म्हणजे काय हो ?

**बटोबाः**—वा ! तुम्हीं तर मला हा शब्दार्थच विचारीत अहांत ? म्हणजे तुम्ही इथं कुठं मुलींच्या शाळेवर मास्तरीण म्हणून अहांत कीं काय ? अहो, " वपन " म्हणजे संन्यस्त होणं,-म्हणजे डोकीवर केस न ठेवणं

वाढविणं ! कारण, श्रीकृष्णावतारी देवानं अमर्याद बायका केल्या; पण शिंची त्यांपैकीं देवाच्या अगोदर एकहि पण मेली नाहीं ! जेव्हां देवाला मिळून सर्वांनीं एकदांचं निर्दाळलं तेव्हांच मग विधवा म्हणून उघड्या-बोडक्या मेल्या ! कारण बोलून चालून त्या देवाच्या बायका ! कोण त्यांच्याशीं तरी पुनर्विवाह लावणार ? त्यातून देवांचं आयुष्य फार असल्या-मुळं, त्यांपैकीं त्यांच्याच हयातींत बऱ्याचशा म्हाताऱ्या झाल्या असाव्यात - आणि मग,–

**इंदिरा:**—माफ करा शास्त्रीबुवा ! तुमचं धर्मज्ञान म्हणजे रायनंदाचा विनोद नव्हे ! तुमच्यासारखे बहुरुपी,–

**बटोबा:**—अहो, जसा देव तसा भक्त ! म्हटलंच आहे कीं बहुरुपी, बहुगुणी, बहुता काळाचा–!

**इंदिरा:**—( संतापून ) तीही तुमच्या अंगीं उच्चारण्याची पात्रता नाहीं ! बंद करा ही बडबड आणि व्हा इथून चालते !

**बटोबा:**—जातो; पण आपलं लक्षांत असूं द्या कीं, मी ब्राह्मणच आहे ! इथला वंशपरंपरागत पुजारीपणाचा मान मजकडेच आहे. कांहीं लागलं बिगलं तर,—

**इंदिरा:**—ी आपली सहानुभूतीची कळकळ, मी आपल्याला साभार परत करीत आहे ! हीन विचारी लोकांचं औदार्य, उपकार बद्धतेंत स्मरून आम्ही त्याला मुळींच काडीचीहि किंमत देत नाहीं; तर उलट कस्पटाप्रमाणं लेखून तुच्छच मानीत असतो, समजलं? या आतां आपण!

**बटोबा:**—( निर्लज्जपणें ) हं, तुम्ही फारच जाज्वल्य दिसतां बुवा ! अगदींच भीडमुर्वत म्हणून कांहीं ठेवीत नाहीं ! बाकी तरुणपणीं नवरा मेलेल्या पोरींचा स्वभाव हा असाच बनत असतो असं म्हणतात ! किंवा मिळालेल्या पुरुषी शिक्षणाचाहि पण हा दोष असूं शकेल ! बरं तर आतां असं करा ! ( तुळशीचा हार पुढं करून ) हा तुळशीचा हार घरांत असूं द्या ! म्हातारीला काढा करून पाजा ! देवाचा आहे ! " अवचित् गुण " येण्याचा संभव फार–!

**इंदिराः**—पुजारीबुवा ! तुमच्या या फाजील लोचटपणाबद्दल मला मात्र आतां हसूं येतंय आणि तितकीच तुमची कींवहि करावीशी वाटते ! तथापि, आतां निमूटपणें चालूं लागा; नाहींपेक्षां मला तुमची षोडशोपचारानं पूजा बांधावी लागेल !

**बटोबाः**—नाहीं–नाहीं ! तितकासा कांहीं मी तुमच्या भावाचा भुकेला नाहीं–आहे–! ( चरफडत निघून जातो. )

**इंदिराः**—कोण हा निर्लज्ज माणूस ! पापांचा बुजबुजाट तर अगदीं रोमरोमांत झालेला दिसतोय ! आणि हा म्हणे देवांचा पुजारी ! मला आश्चर्य हें वाटतंय कीं, या देवस्थानचे पंच डोळस आहेत कीं आंधळे आहेत ! खुद्द संस्थानाधिपति युवराज चांगले सुशिक्षित–तत्त्वज्ञानाचे पी. एच्‌डी. आहेत ! त्यांना हा देव-धर्माच्या नांवांवर चाललेला भावनोद्दीपक आंधळा कारभार माहीत नसेल कां ? या बटोबा पुजाऱ्यासारख्या पापाच्या कंवडाळ मूर्ती, देवाला साक्ष ठेवून, देवळांत हव्वा तसा धुडगूस घालतात; पण आमच्यासारख्या सच्छिल बालविधवांना देवाला जाण्याची,–देवळांत शिरण्याचीहि सक्त मनाई असावी ऑं! मी या अन्यायाचा स्फोट करूं कां ? होऊं कां बंडखोर ( विचार ) बंडखोर बनलंच पाहिजे !

[ दौत लेखणी घेऊन, देवस्थान पंचकमेटीला नोटीस लिहूं लागते. ती लिहून होते न होते तोंच विश्वनाथ आपल्या आईला घेऊन प्रवेश करतो. ]

**विश्वनाथः**—ताई, काय लिहीत बसली आहेस ग ? जा अगोदर आंत जाऊन, आईचं अंथरूण घाल पाहूं ? ( ती आंत जाते ) आई थोडंसं दूध तरी घेणार ना ग ? नाहीं ! बरं तर चहा ! नको तर मग स्वस्थ पडून रहा ! अग तूं आतां मुळींच मरणार नाहींस ! इतक्या बिकट प्रसंगांतून तुझीं हाडं, शाबूतपणें राहून टिकाव धरूं पाहतात; तेव्हां तूं 'सुनमुख' खात्रीनं पाहणार बुवा ! पण आई, आपण विवाह करणार तो पुनर्विवाह बरं कां ? आणि–( इंदिरा येते तें पाहून ) या तुझ्या इंदीचाहि ग ! पण आई, तुझा पुनर्विवाहित जांवई मात्र, आपण अगदीं

कोराकरकरीत प्रथमवरच पाहणार हो ! बिजवर तिजवर नाहीं कामाचा ! ( दोघीही हंसतात ) हंसत्येस काय ! जा अगोदर आईला नेऊन आंत झोंपीव पाहूं !

इंदिराः—( आईला हातीं धरून आंत नेत ) ही तुझी राखीव कामगिरी वाटतं !

विश्वनाथः—राखीव कामगिरी कसली ग तुझ्या कपाळाची ! मातृ-सेवा काय माझ्या एकट्याची आहे वाटतं ! चल निघ ! खबरदार आईला झोंप लागल्याशिवाय पुन्हा बाहेर येशील तर ! [ जातात.

[ इंदिरेनें लिहिलेली नोटीस, विश्वनाथ घेऊन वाचूं लागतो. ]

म्हणजे ! काय वाचतों मी हें ! ताईच्या विचारांचं मतपरिवर्तन एथपर्यंत आलं ! देवस्थान पंचकमेटीला नोटीस देऊन, सकेशा ब्राह्मण विधवेचा मंदिर-प्रवेश, माझी ताई जातीनं पुढाकार घेऊन मिळविणार ! ! अहाहा ! धन्य झालों मी ! एखाद्याला, " कार्येषुमंत्री पत्नि "-मिळाली, तर तो स्वतःला फार मोठा भाग्यवान् प्राणी समजतो; परंतु माझ्यासारख्या नुसत्या कोरड्या विचारांचाच कीस काढणाऱ्या क्रियाशून्याला जर या माझ्या ताईसारखी कार्यकर्ती सख्खी बहीण लाभली, तर साक्षात् देवी सुभद्रेच्या भावाला,-श्रीकृष्णालादेखील; आम्हां बहीणभावंडांचा हेवाच करावा लागेल !

राग-मांड, ताल-त्रिताल.

**मधुसूदना ! भगिनी-सुखाला । जीव हा भुकेला ॥ खरी धर्म-शीला ॥ ध्रु० ॥ करि ज्ञान-माला ॥ कृष्णाग्रजाला । अनुराग वदला; हेवा कराया ॥ १ ॥**

या रूढीविरुद्ध बंड पुकारणाऱ्या बंडखोर रूढीताई—!

इंदिराः—काय म्हणालास ? रडूबाई ?

विश्वनाथः—छे ! छे ! बंडखोर रूढीबाई ! रडूबाई सध्यां आम्ही पुरुषमण्डळी बनत चाललों असून, तुम्ही जर अशा एकापेक्षां एकेक

कार्यकर्त्या निघूं लागलात; तर मात्र लवकरच आम्ही ' दळूबाई ' म्हणून घरांत मुळूमुळूं रडत राहाणार अहोंत खरंच ! बाकी ताई ! तूं हा फारच छान विचार केला आहेस !

इंदिरा—करावा लागला ! भाऊ, आज आईवर हा प्रसंग यायला कारण कोण बरं !

विश्वनाथः—( विचार करीत ) कारण कोण ? कोण कारण बरं ! तूं का मी ! कां टांगेवाला ! नाहीं त्याचं घोडंच ! छे ! छे ! शहर म्युनिसिपालिटी ! पण नाहीं ? आईची भावनाच ! पण भावना तरी कां ! देव म्हणून ! बरोबर, ताई ! आईवर प्रसंग यायला कारण, हा देवच ! हो–देवच ग !

इंदिराः—पण देवाचं अस्तित्व !

विश्वनाथः—म्हणायला सर्व ठिकाणीं ! पाह्यला मात्र सध्यां दगडांत–( जीभ चावून ) नाहीं; चुकलों देवळांत ! तुम्हां आम्हांना मात्र सध्यां आईच्याच स्वरुपांत बरं कां ! पण ती झोंपली आहे ना ! खरंच इंदूताई ! तूं हा प्रश्न सोडून दे. देव हा कल्पनेंत ठेवून, आपण त्याचं अस्तित्व भावनेनं पूज्य धरूं या ! पण धर्माबद्दल मात्र दररोज चोवीस तास संपूर्ण विचार करीत आपण आपलं जीवित खर्चूं या ! कारण, धर्म आणि दिनचर्या यांचं साहचर्य मात्र आपल्याला समाजांत राह्यला फारच तापदायक होतं बुवा ! आतां हेंच पहा ? आई ही आपली देव ! तिचं प्रेम देवावर ! तिच्या मतें देव, देवळांत ! ही आईची भावना ! बरं, आई " आपली " देव, म्हणून पुन्हा देवाच्या देवाची भावना ? बरं, या भावनेचीं बंधनं म्हणजे तुला तिच्याबरोबर जाण्याचा धार्मिक प्रतिबंध ! आणि तो सुद्धां वेदांतर्गत नसलेला ! म्हणजे !

इंदिराः—तूं मात्र मला सध्यां बावचळलेला दिसतोयस ! वेड्या, हॅम्लेटची भूमिका करणार आहेस वाटतं ? ! भाऊ, न संपणाऱ्या विषयावर चर्चा करणं, मला मनापासून आवडत नाहीं ! सरळ मनाला पटेल आणि रुचेल, अशीच धार्मिक रूढि समाजांत वावरणाऱ्या धर्मपुढाऱ्यांनीं रूढ केली पाहिजे ! आजच्या याप्रसंगीं मी एवढाच विचार केला आहे कीं,

माझ्या देवाधर्मांच्या कल्पना वा भावना कांहींहि असोत वा पुढं नवीन उद्भवोत! फक्त मी एक माझ्या आईची भावना सध्यां जाणतें! तिचं देवावर,—"देवळांतल्या देवावर,—" माझ्याच कल्याणाकरिता पण माझ्या पेक्षां प्राणांतिक, असं जिचं निर्व्याज प्रेम आहे ती माझी आई!—हो माझी आई ही मला प्रथम जपली पाहिजे! आणि तिचं जतन करीत असतां, जर समाजानं चंचलरूढीची सैल पण टाकाऊं बंधनं, उद्यां जर धर्माच्या नांवावर मला जखडूं पाहतील, तर त्यांना देखील वेळींप्रसंगीं तोडून टाकायला मी या आपल्या दुतोंडी समाजाची पर्वा अगर भय बाळगणार नाहीं!

राग—अडाणा; ताल—त्रिताल.

**रूढ, रूढि-उपहास। करिन सार्थ मग धर्म-सफलता ॥ धृ० ॥ धर्म-बंधनीं रूढ-शृंखला। तुटत तोंवरी कितिक अबला ॥ कपट नरकीं किति बुडति बाला । खंती नसे मुळीं मूक-मान्यता ॥ १ ॥**

**विश्वनाथः**—बरं पण ताई, समज! या तुझ्या चोवीस तासांच्या नोटीशीच्या मुदतीला, जर देवस्थान पंचकमेटीकडून कांहींसुद्धां उत्तर आलं नाहीं, तर तूं मंदिर-प्रवेश कसा करणार! प्रवेश करत्र! पण तो कसा करणार तेवढंच बोल!

**इंदिराः**—कसा म्हणजे! मी माझ्या स्थितींतल्या एथील सर्व सम-दुःखी भगिनींना बरोबर घेऊन!

**विश्वनाथः**—तें तूं एथल्या घे; नाहींपेक्षां झाडून साऱ्या हिंदुस्थानां-तल्या जमा कर! वाटल्यास सेन्सस्‌चे आंकडे मी तुला पुरवितों! पण देवाला तूं जी जाणार, ती कशी!

**इंदिराः**—आम्ही कसा प्रवेश करावा, असं तुला वाटतं!

**विश्वनाथः**—माझ्या मतें तुम्ही बेधडक कुंकू लावून प्रवेश करावा कारण, माझ्याहि असं कुठं तरी वाचण्यांत,—( आठवून ) मला वांटतं

वनवासानंतरचा ‘ राम–कौसल्या ’ भेटीचाच प्रसंग वाल्मिकी रामायणांतला असावा–! “ माझा दशरथ पिता सुखी आहे ना, ” या प्रभु रामचंद्रानं विचारलेल्या प्रश्नावरून, कुंकुम-तिलक, ” हा मंगल पण शुभदर्शक चिन्ह मानून क्वचित् प्रसंगीं तो उपयोगांत आणीत असावा, असं दिसतं ! तेव्हां शुभदर्शक चिन्ह म्हणून जरूर कुंकू लावायला कांहीं हरकत दिसत नाहीं.

इंदिराः—बरोबर ! याच प्रश्नावर माझा सध्यां विचार चालू आहे ! हाच भाग आतां माझ्या वाचनांत आला आणि म्हणूनच मी आज सर्वांना अबोली वाटते ! बरं पण भाऊ, यांत फसवणूक,–

विश्वनाथः—काय संबंध ? आणि कुणाची फसवणूक ? काय कुंकवावर धर्माचा टॅक्स् आहे ? कां सनातन्यांची मालकी आहे ? आईच्या पोटांतूनच तें तुमच्या कपाळीं लागलेलं ! इदूंताई, लक्षांत घ्या ! आई ही देव ! जशी तिच्या संगोपनाची जबाबदारी तुमच्या शिरावर येऊन पडली आहे, असं समजतां–? तसंच केसांना देखील तुम्ही आपल्या शिरावर घेऊन, त्यांचा भार अगदीं उत्तमप्रकारें वाहिला पाहिजे ! कारण, हीहि देणगी तुम्हांला आईच्या पोटांतूनच मिळालेली आहे, नाहीं कां ?

इंदिराः—पण भाऊ ! असं करणं अम्मळ जरा धोक्याचंच नाहीं कां ? कारण, बदमाषापासून आम्ही “ स्वसंरक्षण ” करण्याकरितां म्हणून जर कुंकू लावूं लागलों; तर “ त्या ” कुंकू लावतात म्हणून उद्यां सर्वच स्त्रिया,–

विश्वनाथः—( मध्येंच ) काय ? पळविल्या जाण्याचा संभव आहे ? असं म्हणत्येस ? हुं, विसरा आतां या गोष्टी ! जागजागीं “ व्यायाम मंदिरें ” नि “ व्यायाम शाळा ” निघाल्या आहेत, त्या काय आतां सहस्त्र भोजनं झोडण्याकरितां ? छे ! छे ! आत्तां इथून पुढं परार्धागणिक “ सहभोजनं ” चोपायचा काळ चालू करावयाचा आहे ! तें कांहीं नाहीं ! मळवट भरून खुशाल सगळ्या बायकांनीं जरी एकदम मंदिर प्रवेश केला तरी कांहीं हरकत नाहीं ! होऊंच द्या तर मग खळबळ !

इंदिराः—पण मी तुला असं विचारत्ये, भाऊ ! अरे, मळवट भरून

आम्ही मंदिर प्रवेश करण्यापेक्षां, इतर सर्व स्त्रियांनीं जर आमच्याप्रमाणं म्हणजे कुंकू न लावतां प्रवेश करण्याची तूं खबरदारी घेशील तर,–

**विश्वनाथः**—( मध्येंच नकार दर्शवित ) मी कांहीं एक करणार नाहीं ! हा आमचा विषय नव्हे ! ज्याचं त्यानं आपलं ठरवावं नि करावं हें ठीक ! वाटल्यास,–

**इंदिराः**—( मध्येंच ) पुरें ! नोटीस ही कांहीं मी तुझ्या सल्लामसलतीनं देत नाहीं ! तेव्हां या बाबत तूं आतां विचार न करणं, हें चांगलं नाहीं कां ! मी तरी विचारपूर्वकच कांहीं निश्चय केला असेल ना !

**विश्वनाथः**—केव्हांहि ! बरं ताई, चल आपण अगोदर जेऊं या ! कारण, मला आतां बाळकृष्णपंताकडे, अत्यंत महत्त्वाच्या कामाचा विचारविनिमय करण्याकरितां म्हणून, आमच्या मंडळांत जायचं आहे. कदाचित् फार रात्र होईल यायला ! तेव्हां तूं आईजवळ आहेसच !

**इंदिरा**—बरं ! अरे पण, भाऊ ? बरं तर चल–

**विश्वनाथः**—( मागें परतून ) तरी पण–?

**इंदिरा**—नाहीं रे ! या देवदासी सांप्रदायाबाबत–? म्हणजे असं कीं तो बटोबा पुजारी त्या मुलीचा माग काढीत,–

**विश्वनाथ**—( मध्येंच घाबरत ) काय इथं येऊन गेला ? म्हणजे पीडाच आली होती ! आतां जेवतांना देखील याच कलीपुरुषाचं स्मरण !

---

## प्रवेश २ रा.

( स्थळः—देवालय रस्ता. यल्लीला बटोबा पुजारी नाजूक मारानं म्हणजे गुलाब पाण्याच्या पिचकाऱ्या मारीत मारीत प्रवेश. )

**बटोबाः**—( पिचकाऱ्या मारीत ) चल हो पुढं ! म्हणे मी देवळांत येत नाहीं ! मग देवाची शेज काय आतां तुझी आई येऊन भरणार आहे ? चल देवापुढं !

यल्लीः—पण द्येवा तुमच्या लक्ष्मीनारायणाला मला थोडीच वाह्यली हाय ! मी हाय आई यल्लाईची दासी !

बटोबाः—( पिचकाऱ्या मारीतच ) पण मिळून देवदासीच ना ! अग, तुझी आई यल्लाई ही आमच्या श्रीलक्ष्मीनारायणाची ठेवलेली बटीक आहे ! मरीआई, जरी आईसारख्या कैक भटकभवान्या आमच्या देवाघरीं राबतां पण जागता पहारा करीत सदा तिष्ठत बसलेल्या असतात ! अग, जिथं आम्ही आर्यांनीं तुम्हां जंगली आणि असंस्कृत लोकांच्या क्षुद्र देवदेवता मोठमोठ्या मान्यतेनं स्वतःच्या देवांच्या पंक्तीला बसविल्या; तिथं त्यांना वाहिलेल्या तुझ्यासारख्या कंगाल पण कोंवळ्या देवदासीवर आम्हां पुजाऱ्यांचाच हक्क, कायद्यानें प्रस्थापित केलाय ! चल अगोदर देवाच्या शेजघरांत !

यल्लीः—( चिडत ) पण तुमी कां पिचकाऱ्या मारून, माजं लुगडं भिजविताया ! किसनाथावानी मी काय तुमची गौळण हाय वाटतं ! द्येवा, पुरें वरं कां ! लई झालं साँग ! नग आतां या पिचकाऱ्या.

बटोबाः—( पुनः उडवितच ) अग ह्या "द्येवाऱ्याच" गुलाब पाण्याच्या पिचकाऱ्या अंगावर उडताहेत—आणि उडविणारा—मारणारा मी आहे, हे भाग्य लक्षांत घे पोरी ! अशी इतक्यांतच कांट्याला येऊन, काकडत्येस कां ! उबेला अजून देवाच्या पानपट्टीच्या म्हणजे त्रयोदशगुणी गोविन्द विड्याच्या पिचकाऱ्या, तुझ्या तोंडापर्यंत नेऊन, मी तुझं थोबाड लाडांत येऊन चांगलं रंगवीलं नाहीं, यांत तूं आपल्या आई यल्लाईची अब्रु अजून बचावलीय, हें लक्षांत असूं दे म्हटलं ! आणि आतां अधिकच जर इथं तोंडाचा पट्टा सोडशील, तर हें पाहिलंस कां केशरी गंध ! तोंडांत कोंबून बोलती बंद करीन ! चल हो पुढं निमूटपणें देवळांत ! कां घालूं तोंडांत हें गंध !

यल्लीः—अग, आय आय आय ! तुमास्नी तर आतां नव्या नवऱ्यावानी, अक्श्शी हळद खेळावयाचं वारं शिरलंय जनुं !

बटोबाः—मग इतक्या दिवस फुकटच देवाच्या नैवेद्याच्या लाडू करंज्या खाल्ल्यास वाटतं ! रात्र संपली नाहीं तोंच, उजाडतांच—देवाचा

बालभोग,–शिरा चापायला तुला जो आजपर्यंत मी दिला तो काय मला पचत नव्हता म्हणून होय ! ( पिचकाऱ्या मारतो. )

यल्लीः—बाबा, लई पिचकाऱ्या सोडूं नका बरं कां ! थंडीनं माजा जीव मराया लागलाय !

बटोबाः—बेहेत्तर आहे मेलीस तरी ! तूं एक 'देवदासी' मेलीस म्हणून कांहीं "देवदासीची चाल" मरणार आहे थोडीच! आणि आज शेवटचं तुला बजावून ठेवितों कीं, पुन्हा जर तूं मला बाबा म्हणशील तर याद राख ! आज तागायत मी तुला गुलाबपाण्यांत बुडविली–केशरी गंधांत मळविली, उत्तमोत्तम वस्त्रालंकारांनीं मढविली–चांगल्या सुगंधी फुलांत निजविली; पण आता मात्र कापूर चंदनांत जाळून देवादारीं मुक्ति देईन समजलं !

यल्लीः—तर–तर! अगोदर माज्या आई मुक्ताम्माला मुक्ती दिल्याबिगर मी तुम्हांला बरी माजी मुक्ती देऊं देईन ! बाबा, सोडा बरं कां ! मी नाय येणार रात्रीची देवळांत ! जाऊं द्या मला घरीं ! आई दम्यानं मरतीया !

बटोबाः—अग आतां ती दम्यानंच मरायची ! तिच्यांत दम राहिलाय कुठं ! तिचा दम केव्हांनाच उखाडला गेला ! पण तो सध्यां मात्र तुझ्या ठिकाणीं भरलाय, नाहीं कां ? ए दमदार पोरी ! अशी दमांत उखडून मला झिडकारायला मी काय एखाद्या " मेंग्याभाऊ मुरळीचा, " " खंडोबा कानडा " म्हणून नाचणारा वाघ्या आहे, होय ?

यल्लीः—नाचनारा नसल; पण शेंपूट हलवून गोंडा घोळणारा—

बटोबाः—( तोंडावर हात ठेवून ) काय कुत्रा ? चूप !

यल्लीः—बरी गप्प राहीन ? द्येवा म्होरं बसून, असंच काळ्याची पांढरं केल्याती जनुं ! थांबा उलुसं ! एकदां मला शिक्षान तर घेऊं द्या; म्हजी मंग ही देवदासी तुम्हां पुजाऱ्यांचीं संमदी बिंगं बाहेर काढूनश्यान एकेकाची बोंबलावानी कांडंच भाजीन बगा !

बटोबाः—काय ? तूं आतां शिक्षण घेणार ? कोण शिकविणार बुवा तुला ?

यल्लीः—आपल्या ईश्वनाथरावची बहीण इंदूताई–?

**बटोबाः**—काय ! त्या विश्याची विधवा–!–कुठलं हें कुटुंब इथं वस्तीला येऊन राहिलंय नकळे ! अस्सं ! एकूण तुला तो मघाचा टांग्याचा अपघात बाधला तर !

**यल्लीः**—अपघात मला नाय झाला; तर इंदूताईच्या आईलाच दुखापत झालीया ! मी मात्र द्येवाच्या पंचामृताचा चांदीचा तांब्या,—

**बटोबाः**—( घाबरून ) काय, तिथं विसरून आलीस ! अग कारटे ! मरूं दे ती आतां देवाची शेज ! जा अगोदर पळ घरीं–! आणि मोठ्या पहांटेस उठून, देवाच्या काकडार्तीला तो चांदीचा तांब्या हजर कर !

**यल्लीः**—पन आतां त्येंच्या घरीं कशी जाऊं ! रात्रीचं गस्तवालं मला आडवत्याल कीं—!

**बटोबाः**—अग आतां कुठं तुला मी "त्याचं घर निघ" म्हणून सांगतोंय ! सकाळींच–! उजाडतांच–! ( गालावर-टिचकी देत ) तोंडाला तोंड दिसलं नाहीं तोंच— !

**यल्लीः**—बरं तर आणीन ! पन देवळांत असा लघळपना नाय करूं देनार. [ फणकाऱ्यानं निघून जाते. ]

**बटोबाः**—छे ! छे ! करायला जावं एक नि होतंय भलतंच ! ( विचार ) तरी पण जें झालंय, तें एकंदरींत माझ्या पथ्यावरच आहे म्हणायचं ! ह्या विसरभोळ्या देवदासीच्या या कृत्याचा,–मी एखादं नाटकी दृष्य दाखवून, उपयोग करून घेऊं कां ! घेऊं या ! त्या घोड-विधवा बाल इंदीला चामुंडा करून या देवस्थानच्या चंदींत,–अन्नछत्रांत– हातात लाटणं देऊन पोळ्या भाजायला बसविल्याशिवाय, आजचा माझा तिनं केलेला अपमान भरून निघणार नाहीं ! अर्थात् ही संधि आणायला तिचा तो भाऊ विश्या याला अगोदर देवाच्या चांदीच्या ताब्याचा, चोरीचा आरोप ठेवून, तुरुंगाच्या दारांत नेला पाहिजे ! मग मी आहे आणि त्या मायलेकी ! सरळच पहातां येईल त्यांना ! चला, प्रथम यल्लीचा बंदोबस्त ! नंतर एकदम तडक पोलीस ठाणं ! आणि जमल्यास तावडतोब विश्याला अटक ! उद्यांच्या उद्यां पाहून घेऊं !

( गडबडीनं निघून जातो. )

[ उलट बाजूनं गस्तवाल्याबरोबर वेषांतरीत संस्थानचे युवराज एस्. बाळकृष्णन् व देवस्थान संस्थानचे वयोवृद्ध ट्रस्टी कर्नल इन्स्टीट् हे प्रवेश करितात. बरोबर यल्ली. ]

**एस्. बाळकृष्णन्ः**—सर, पाहिलांत ना हा संस्थान देवस्थानचा आंधळा कारभार ! आणखीहि पण या मुलींकडून आम्हांला बऱ्याचशा गोष्टी समजण्याचा संभव आहे ! तेव्हां आम्ही हिला परस्परच–

**कर्नल इन्स्टीट्ः**—खुशाल तुम्ही आपल्या बंगल्यावर नेऊन हव्वी-तशी विचारपूस करा ! परंतु अप्पासाहेब ! उतावीळपणा मात्र करूं नका ! कारण, ही तुमची धार्मिक बाब आहे !

[ गस्तवाले व शिपाई यल्लीला बरोबर घेऊन जातात. ]

**एस्. बाळकृष्णन्ः**—पण, सर ! या धार्मिक बाबीचं स्वरूप, हे पाहिलंत ना प्रत्यक्षच !

**कर्नल इन्स्टिट्ः**—पाहिलं ! कळलं ! समजलं ! परंतु अप्पासाहेब ! आपल्या व्यापक क्षेत्राखालील सर्व बऱ्यावाईट गोष्टींचा मिलाफ घडवून आणणारी एक जातिवंत जिवंत संस्था म्हणजेच तुमचा हा विश्वव्यापी हिंदूधर्म आहे ! सत्यनिष्ठा आणि यच्च्यावत् मानवजातीबद्दल आदर, या दोन तत्त्वांना अनुसरून तुम्ही हिंदूलोक वागत असतां–!

**एस्. बाळकृष्णन्ः**—सर, अभिमानपूर्वक हें आम्हांला कबूल आहे ! आणि म्हणूनच यच्च्यावत् मानवजातीबद्दल आदर दाखविण्याकरितां म्हणून आम्ही आपल्याजवळ संस्थान देवस्थानचीं झाडून सारीं अन्नछत्रं नि सदावर्तें, सर्रास आमच्या संस्थानांतील सुशिक्षित बेकारांकरितां मागत आहोंत ! अवघ्या पावणेतीन कोट लोकसंख्येंत ऐंशी लाख सुशिक्षित बेकार राहवेंत, हें आमच्या संस्थानला अगदीं लांछनास्पद आहे !

**कर्नल इन्स्टीट्ः**—नुसतं लांछनास्पदच नव्हे; तर निव्वळ नाशास्पद आहे ! आम्हांला हें कळतं; परंतु उपयोग काय ! कारण, हिजहायनेस महाराजा, सर राजे सारंगधररावनूनीं–म्हणजे आपल्या वडिलांनीं, या आपल्या संस्थान देवस्थानचं " ट्रस्टडीड " फारच नाजूक करून ठेवलं आहे ! त्यांत आतां फेरबदल कसा करतां येईल ! !

**एस्. बाळकृष्णन्ः**—( साश्चर्य ) कसा करतां येईल ! सर, तो आतां आपण मिळून–!

**कर्नेल इन्स्टीद्ः**—सॉरी ! इम्पॉसिबल. फिजीकल इम्पॉसिबल !

**एस्. बाळकृष्णन्ः**—कां !

**कर्नेल इन्स्टीद्ः**—कारण, देवस्थानचा नि संस्थानचा संबंध, अगदीं स्वतंत्र असाच आहे !

**एस्. बाळकृष्णन्ः**—पण आमच्या संस्थानच्या उत्पन्नांतूनच, हें आमचं देवस्थान उत्पन्न झालं आहे ना !

**कर्नेल इन्स्टीद्ः**—होय ! पण तें वंशपरंपराधीन आहे ! त्याच्या उत्पन्नाचा ट्रस्ट हा फार वेगळा आहे !

**एस्. बाळकृष्णन्ः**—पण आम्ही असं विचारतों कीं, उद्या जर आमच्या संस्थानची तिजोरी रिकामी पडली आणि आमचे कर्ते संस्थानी प्रजानन जर भुकेनं तडफडून मरूं लागले, तरी देखिल आम्हांला या देवस्थानची तिजोरी वापरतां येणार नाहीं ?

**कर्नेल इन्स्टीद्ः**—( निराश होत ) आपल्या वडिलांचाच तसा चमत्कारिक ट्रस्ट आहे !

**एस्. बाळकृष्णन्ः**—बरं उद्यां जर संस्थानच्या लोकसंख्येइतकेंच सुशिक्षित बेकार झाले आणि त्यामुळें कदाचित् या आमच्या मूळ संस्थानला धोका आला, तरी देखिल आमचे हें देवस्थान कायम राहणार ?

**कर्नेल इन्स्टीद्ः**—होय ! तशी सर्व तयारी मुद्देसूद आहे ! कारण, देवस्थानची आर्थिक परिस्थिति फार चांगली आहे !

**एस्. बाळकृष्णन्ः**—चांगली आहे आणि ती चोरापोरावारी अथवा तेलाधूपावारी समाजकंटक पाप्यांच्या हातून फुकटच्या फाकट वाया जाऊं नये, एवढ्याचकरितां तर आम्ही आपल्याजवळ अन्नछत्रांची नि सदावर्तोची मागणी करीत आहोंत ! सर, आपण आमच्या वडिलांचे जसे विश्वासू मित्र म्हणून या आमच्या देवस्थानचे मुख्य ट्रस्टी अहांत, तसेंच आपण आमचे बाळपणीचे शिक्षकहि अहांत ! हिंदुधर्मावर आपलं प्रेम आहे !

आणि याच देशांत आपण आपली सर्व हयात घालवून हिंदूधर्माचं साद्यंत तत्त्वज्ञान मिळविलेलं आहे ! इतकंच नव्हे, तर आपणच आम्हांला अमेरिकेंतील शिकागो युनिव्हर्सिटीतर्फे तत्त्वज्ञान विषयक पी. एच्डी. ची डिग्री " अप्टन लेक्चरर " बनवून, मोठ्या आग्रहानं घ्यायला लावलीय, हें आपण विसरूं नका !

**कर्नल इन्स्टीद्ः**—( गंहिवरत ) कबूल ! त्रिवार कबूल ! पण, अप्पासाहेब, व्हॉट् कॅन आय् डू नाऊ ? काय करावं ?

**एस्. बाळकृष्णन्**—एवढंच करा ! सर, तुमच्या देवस्थानांतल्या अन्नछत्रांत आमची सुशिक्षित बेकार मंडळी कांहीं दिवस जेवूं द्या ! कारण, मग प्रत्येकी चार आण्याप्रमाणं जरी उत्पन्न धरलं, तरी देखील वीस लाखांचं वाढतं उत्पन्न दररोज आमच्या संस्थानच्या तिजोरींत येऊन पडेल ! सध्यां फुकट जेवणाऱ्यांचा संस्थानला काडीमात्र तरी कांहीं उपयोग आहे कां ?

**कर्नल इन्स्टीद्ः**—संस्थानलाच काय, पण देवस्थानला तरी कुठं आहे ? अचूक मतप्रतिपादन हा धर्म नसून, सदाचारी जीवन म्हणजेच धर्म आहे,-ही जाणीव सध्यां हिंदू लोकांना राहिली नाहीं ! कारण, सत्यापेक्षां सांप्रदायावर म्हणजे त्यांचं स्वतःवरच फार प्रेम आहे ! तेव्हां, अप्पासाहेब ! आपण जरा शांत व्हा ! आपली ही कळकळ आणि सत्यनिष्ठा पाहून आम्हांला आनंद होतों ! तरी पण, संस्थानच्या ऐंशी लाख सुशिक्षित बेकारांनीं, जर तसा सनदशीर प्रयत्न करून, संस्थानच्या विधिमंडळांत एखादं कायदेशीर नवीन बिल आणलं आणि तसा कायदा करवून घेतला; तर मात्र आपण म्हणतां, तसा विचार आम्हीं अवश्य करूं ! आपण तसा जरूर प्रयत्न करूं या !

**एस्. बाळकृष्णन्ः**—ठीक आहे ! हाच आम्ही विचार केला होता ! विधिमंडळानं नवीन लादलेले कर, आम्ही आतां आमच्या प्रजाजनांवर मुळींच लादूं इच्छित नाहीं ! आमच्या गरजा फारच थोड्या आहेत; आणि देवाधर्माच्या भावनेवर वाहणारा पैशाचा पूर, हा सप्तसागर भरून उरण्याइतका फार आहे !

**कर्नेल इन्स्टीट्:**—फार आहे ! स्वानुभवानंच जर सिद्ध करायचं तर अपरंपार आहे ! अप्पासाहेब, ट्रस्टी या नात्यानं आम्हांला मिळणारा पगारसुद्धां फार आहे ! दरमहा आठशें रुपये आम्हांला,-एकट्याला आहे ! युवराज. तुमचं स्वावलंबन आणि गोरगरिबांविषयींचा प्रयत्न पाहिला म्हणजे आम्ही घेत असलेल्या पगाराबद्दल आमची आम्हांलाच शरम वाटूं लागते ! आणि आज आपण जें मुद्दाम आम्हांला अशा वेळीं बोलावून देवस्थान संस्थानांतील कांहीं घाण प्रकार दाखविले, त्यावरून तर आपण आमची नालायकीच शाबीत करून, दाद मागत अहांत ! आम्हीं उद्यां अगोदर, देवळावर कडक पहारा ठेवून, देवांचें अलंकार आणि उपकरणें यांची तपासणी करूं ! आपण उद्यां रात्रीं त्या पोरीला घेऊन जर आमच्या बंगल्यावर याल तर आम्ही आपलें अत्यंत आभारी होऊं ! वाटल्यास आपण आपल्या वडिलांचं ट्रस्टडीडहि पण पाहूं शकाल !

**एस्. बाळकृष्णन्**—जरूर पाहीन ! या आतां आपण !.

**कर्नेल इन्स्टीट्:**—ऑल् राईट ! माय डियरेस्ट प्रिन्स् गुड नाईट् !

[ हस्तांदोलन करून कर्नेल इन्स्टीट् जातो. एस्. बाळकृष्णन् जाणार तोंच विश्वनाथ प्रवेश करतो. ]

**एस्. बाळकृष्णन्:**—कोण, विश्वनाथपंत !

**विश्वनाथ:**—कोण, बाळकृष्णपंत कां ? वा ! कार्याला शकुनच म्हणायचा !

**एस्. बाळकृष्णन्:**—म्हणजे ? मी मंडळांत आलों नाहीं, म्हणून वाटतं हें ?

**विश्वनाथ:**—छे ! छे ! तसं कांहीं नाहीं ! मी आपला शुद्ध भावनेनंच खरं तें बोललों ! अहो, पोटापाण्याच्या मागं तुम्हीं आम्ही लागलेलों ! तेव्हां तुमच्या आमच्या गांठीभेटीच्या वेळां ह्या चुकायच्याच !

**एस्. बाळकृष्णन्:**—कबूल ! पण मण्डळाच्या बैठकींतली आपली मुख्य कामगिरी तर नाहीं ना चुकली ! केलांत ना बिलाचा मसुदा तयार !

**विश्वनाथः**—हो ! हा पहा माझ्या खिशांतच आहे ! ( तो देऊन ) सकाळींच मी आपली भेट घेणार होतों; बरं झालं आत्तांच आपली रस्त्यांत भेट झाली !

**एस्. बाळकृष्णन्ः**—( बॅटरीचे सहाय्यानें बिलाचा मसुदा वाचित ) छान आहे मसुदा. विश्वनाथपंत, मी हा घेऊन जातों ! पहातों मलाहि जर आणखी कांहीं यांत नवीन घालण्यासारखं सुचलं तर ! उदईक मी तुम्हांला तुमच्या घरींच येऊन भेटेन. हं, समजलं ? घेऊं या तर आतां आपण निरोप ! उगीच उपासमारीतलीं हीं फारवेळचीं जाग्रणं नकोत !

**विश्वनाथः**—बरोबर–!

**एस्. बाळकृष्णन्ः**—हुं, बरोबर म्हणून पुन्हा थांबू नका ! हला आतां. गुड नाईट ! ( गडबडीनं निघून जातो. )

**विश्वनाथः**—उपासमारींतलीं जाग्रणं नकोत ? खरंच नकोत ! परंतु सध्यां जगांत चाललंय काय ? उपासमारींतलीं जाग्रणं तर दररोज कोट्या-वधि लोकांचीं डोळेफोड करूनच चाललेलीं आहेत !

राग–**बागेश्री** ताल–**त्रिताल.**

**अन्नान्न ही झाली दशा । तरि अवदशा ॥ करि दुर्दशा ॥ धृ० ॥ अपराण्ह काळीं । माध्यान्ह वेळीं । हाहाःकार सगळा ॥ निद्रा नुरे; जीव मृत्यू–वशा ॥ १ ॥**

[ जाऊं लागतो तोच बटोबा पुजारी पोलीसासह प्रवेश करून ]

**बटोबाः**—पकडा या चोराला ! हा पहा तोच हा–!

**विश्वनाथः**—कोण चोर ? ! मी ?

**बटोबाः**—हो ! हो ! तूंच ! संस्थान देवस्थानचा चांदीचा तांब्या, मुद्देमालासह तुझ्या घरांत सांपडला आहे ! आणि असल्या भुरट्या चोऱ्या आपल्या बहिणीलाहि पण करतां याव्यात म्हणून ही नोटीस तूं देवस्थान पंचकमेटीला देणार होतास होय ? बसा, आतां दोघेही तुरुंगांत ! अहो

शिपाईबुवा, करा याला चतुर्भुज! (त्याला ते कैद करतात) तिकडे बहीण गेलीच आहे अगोदर फरासखान्यांत! ओवाळील पंचारती!

**विश्वनाथः**—अरे चोरा–[ उसळून अंगावर जाऊं लागतो. ]

**बटोबाः**—शिपाईदादा आवरा! न्या याला लवकर! (त्याला ते नेतात.) चला, यष्टीला बरोबर घेऊन, देवाच्या काकडार्तीला हजर राहिलं पाहिजे! [ जातो.

---

## प्रवेश ३ रा.

( **स्थळः**—विश्वनाथाचें घर त्याची आई देवपूजा संपवीत आहे असें दृश्य. )

**वारणाक्काः**—देवा! सृष्टीच्या मूळ उत्पत्तीचा प्रश्न सोडवितांना प्रत्येक वेळीं निर्गुणब्रह्माचं किंवा सगुणोपासनेचं अस्तित्व, मनुष्य प्राण्याला या जगाचा हस्तीदंती व्यवहार पाहून मान्यच करावं लागतं कारे! कारण, देवा! तुझें सगुण स्वरूप कसेंही असो! परंतु त्यापासून उपासक भक्तांना आनंद, शक्ति आणि तेज हीं खात्रीनं अनुभवायला मिळतच असतात! आणि म्हणूनच सर्व मानवी कृतींचा उगम हा वासनांतूनच होत असतो ना! (सोन्याचा बाळकृष्ण हातांत घेऊन) तर मग भगवान श्रीगोपालकृष्णा, ईश्वराविषयींच्या कल्पनातीत भावना ही मानवी आत्म्याचं, परमात्म्याशीं कोणतं ना कोणतं तरी नातं व्यक्त करून उघड करितच असतें,नाहीं! (गहिंवरून) देवा, मी आज तुला सत्यभामे, प्रमाणं जगाच्या बाजारांत विक्रीला म्हणून काढणार आहे! देवा, मला क्षमा कर. तुझं आणि जगाचं काय नातं आहे, हें गूढ उकलायला अजून मानवी मन असमर्थ स्थितींतच साशंक आहे! पण देवा, साशंक असूनही मी सध्यां भ्याले आहे रे! कारण तुझ्या स्वरूपांत माझ्या डोळ्यांनां दिसणारी माझी इंदू,—माझा विश्वनाथ,

[ सद्गदित कंठानं रडूं लागते. इंदिरा प्रवेश करते. ]

**इंदिरा**:—आई आई,असा रडून धीर सोडू नकोस. ही पहा मी कशी सुटून आलें बरें ! भाऊ देखील असाच निर्दोषी म्हणून, आतां इतक्यांत सुटून येथें येईल ! अग, मुळांत जिथं आम्ही कांहीं केलंच नाहीं, तिथं पोलीस नाहीं पोलीसचा बाप, आमचं काय करूं शकणार ? आणि आई, झाला गेला भूतकाळ हा अटळ जरी असला; तरी पण उज्वल भविष्य-काळ मात्र, व्यक्तीच्या वर्तनावरच अवलंबून राहत असतो ! आपल्या धर्मातला कर्मवाद तरी, याहून काय अधिक रडणार !

**वारणाक्का**:—कर्म माझं ! बाळ, तें कांहीं जरी असलं, तरी पण जग हें स्वप्न आहे आणि ( श्वास टाकून ) अनुभवाच्या सर्व गोष्टी हा मात्र भ्रम आहे !

**इंदिरा**:—पण असा कोणताही सिद्धांत, अद्याप पावेतों कुणी प्रस्था-पित केलेला नाहीं !

**वारणाक्का**:—प्रत्यक्षाला सिद्धांताची काय जरूरी ! बाळ, जरा जवळ ये ! ये बैस अशी. बरं पण तुझं काय झालं !

**इंदिरा**:—कशाचं ! मला पोलीसांनीं पकडून नेली होती, त्याचं होय ! आई, होतंय तें बऱ्याकरतांच ग ! येऊन जाऊन माझा संशय पोलीसांना कां आला ! तर मी ती नोटीस लिहून ठेविली होती म्हणून ! बरं झालं ! अनायासें ती आतां पोलीसमार्फत पंचाकडे गेली ! शिवाय, पोष्टाचा खर्चहि पण वाचला !

**वारणाक्का**:—पण विसूला सोडवून आणायला, कांहींतरी खर्च हा येईलच ना !

**इंदिरा**:—मला नाहीं वाटत तसं ! मी खर्चाशिवायच नाहीं का सुटून आल्यें ! आणि आई, पोलीशी प्रकरणांत, मनुष्याला फारसा असा खर्च लागतच नसतो ! फक्त थोडीशीं धक्काधक्की किंवा क्वचित् प्रसंगीं बराचसा खरपूस मार खावा लागतो ! पण तो देखील अपराध्यानांच हो ! निरपराध्याची पारख, आईपेक्षांहि पण पोलीसांनाच जास्त असत्ये ! हा

माझा आत्तांचा ताजा अनुभव आहे. भाऊ आल्यावर देखील तो तुला हेंच सांगेल !

**वारणाक्का:**—तरी पण कांहीं जवळ असलेलं बरं नाहीं कां ? होतं नव्हतं तें किडुक-मिडुक आजवर मोडतोड करून कशी तरी जीव-गुजराण केली; ( श्वास टाकून ) आतां वंशपरंपरेतलं हें शेवटचं देवसाधन ; [ मुठींत बाळकृष्ण धरून रडूं लागते. ]

**इंदिरा:**—आई–आई ! मुठींत घेऊन काय रडत्येस पाहूं ? (पाहून) देवांतला सोन्याचा बाळकृष्ण ? सराफाकडे नेऊन याला सायुज्जमुक्ती देणार आहेस वाटतं ?

**वारणाक्का:**—बाळ, देवसाधनांचा उपयोग जर पडत्याकाळीं करून घ्यायचा नाहीं, तर तो केव्हां बरं ? होतं नव्हतं तें चोरापोरावारी गेलं ! आतां देव साधनांवरच आपणांसर्वांची सारी भिस्त ! नाहींपेक्षां आहे हेंहि साधन हातचं निघून जाईल; आणि मग कवड्यारेवड्या करीत प्राण सोडायची पाळी येईल ! बरं पण तूं अगोदर स्नान करून, बाकीचे देव ठेवलेल्या ठिकाणीं ठेवून दे; आणि हें पहा, स्वैपाकघरांतून तो वरवंटा इकडे आण पाहूं ?

**इंदिरा:**—( घाबरून ) कशाला ग आई ? डोकंबिकं फोडून घेण्याचा तर कांहीं विचार नाहीं ना? मग कशाला हवा आहे तुला,–बाकी आमच्या लहानपणीं बाबा बाहेरून घेऊन आले कीं, तूं त्याला नेहमीं सोबतीला घेऊन बसायची ! ती तर तुला यावेळीं आठवण नाहीं ना झाली ? आई, कशाला हवा आहे ग तुला वरवंटा ?

**वारणाक्का:**—बरं तर, तूं जा आतां स्नानाला ! लवकर अटप. मी अमळशानं थोडी बाहेर जाऊन येत्यें ! ( इंदिरा जाते व म्हातारी वरवंटा घेऊन परत येत्ये. ) देवा ! सत्त्व पाह्यची तुला भारी खोड ! सत्यभामेच्या दानाच्या निमित्तानं असंख्य गोपींच्या वस्त्रालंकारांची किंमत तुला प्रिय असणाऱ्या देवि रुक्मिणीच्या एका तुळशीपत्रानं केली आणि शेवटीं नारदाच्या हातीं तुळशीचं पान देऊन तूं आपली किंमत मात्र त्रिभुवनांत

हलकी करून घेतलीस ! पण यावेळीं मात्र मी नारदापेक्षांहि स्वतःला फार मोठी भाग्याची समजत्यें ! कारण, कांहीं नाहीं म्हटलं तरी अगदींच माझ्याहातीं नारदाप्रमाणें तूं कांहीं तुळशीचं पान खास देणार नाहींस ! ( रडून ) त्रिभुवनाधिश श्रीगोपालकृष्णा ! काय ही तूं माझ्यावर वेळ आणलीस बरं ! देवा, सत्त्वाला जागण्याकरितां म्हणून देवि चांगुणेनं आपल्या पोटच्या मुलाचं शीर, मृत्युंजय महादेवाच्या भुकेकरितां उखळांत घालून कांडलं ! पण मी तर ममतेच्या स्वार्थांध दृष्टीला भुरळून तुला आतां या वरवंट्यानंच चेंचित बसतें म्हणजे तुला तुझ्या यशोदा मातेच्या थोपटण्याचीच प्रचीति येईल बरं ! [ वरवंट्यानं सोन्याचा बाळकृष्ण ठेंचित राहते. ] देवा, थांबा ! रडूं नका ! मी आतां अंगाई गीत गाऊन तुला पोटाशीं घेते हं—!

इंदिराः—( प्रवेश करून ) आईनं बाळकृष्णावर वरवंटा फिरवून, त्याला निराकार बनविला वाटतं ! किती धोरणी आहे ही ! आपल्या मुलांमुलीवर ओढवलेल्या या प्रसंगामुळं, ही अशी सावध झाली आणि तिनं हें देवाचं मूळस्वरूपच बदलून टाकलं ! परिस्थितीच्या वरवंट्यानं, तूं आपल्या दिखाऊ भावनेचा चेंदामेंदा केलास आणि आज एक जगण्याचा नवीनच उपक्रम जगाला दाखविलास ! अहाहा ! धन्य धन्य माते तुझी !

वारणाक्काः—( व्यामोह आंवरीत ) कोण काय पुटपुटतंय तिकडे ! कुणी मला नांवं तर ठेवीत नाहीं ना ! कोण आहे तें ! बोलत कां नाहीं !!

इंदिराः—आई, मी तुझी इंदीच इथं उभी आहे ! आणि तुझ्या या कृत्याला नांवं ठेवण्याचा जगाला काय अधिकार आहे, सांग पाहूं ! काल आमची जशी विटंबना झाली, तशी होऊं नये म्हणूनच कां तूं या आपल्या बाळकृष्णाचं स्वरूप सोन्याचं केलंस ! सांग, आई ! तूं आज असं कां केलंस ! अग हा बाळकृष्ण तर आपलाच आहे ना ! मग आपली आपल्यालाच चोरी !

वारणाक्काः—( गहिंवरत ) बेटा, चोरी आहे तर ! अग आपण सध्यां निर्धन आहोंत ! कालच पहा ना ! कुणाचा देव ! कुठलं देऊळ !

कसला तांब्या ! आणि कोणता प्रसंग ? चोर निसटला आणि गरीब साव माझा विसू मात्र अडकला ! बाळ, ही द्रव्येषणा–द्रव्येषणा बरं ! इंदा, हा सोन्याचा बाळकृष्ण माझ्या माहेरचा होतां ! दारीं हत्ती झुलत होता, तेव्हां हा देव्हाऱ्यांत साजून दिसला ! पुढं मात्र—( रडूं लागत्ये ! )

इंदिराः—काय झालं आई ? बोल ना !

वारणाक्काः—बाळ, मला आतां जास्त बोलवत नाहीं ! माझ्या लग्नाच्या वेळीं तिकडून हा सोन्याचा बाळकृष्ण शुभ म्हणून चोरी करून घरीं आणणं झालं आणि आजपर्यन्त त्याची मी मनोभावें पूजा–अर्चा केली ! परंतु आज मात्र त्या निर्दय चांडाळानंच जेव्हां या माझ्या सोन्यासारख्या जीवांवर–! इंदे, मेला पूजारी बनून इथंच–हो–इथंच काळं तोंड करून वावरतोय ! जगातलं कोणतंहि पण व्यसन नि पातक म्हणून करायचं त्या मांगानं आता बाकी ठेवलेलं नाहीं !

इंदिराः—आई–आई ! तुला भ्रम बिम तर झाला नाहीं ना ? काय हें तूं बरळत्येस ?

वारणाक्काः—भ्रम ? मला भ्रम ? आणि तो काय म्हणून ? कशाकरितां नि कुणाकरितां ? बेटा, म्हणूनच मी म्हणत्ये कीं, जगाचा व्यवहार हा जर स्वप्नवत् मानला; तर अनुभवाच्या गोष्टीं या भ्रमांतच मोडत असतात ! हें ऐकून तूं अशी भ्रमिष्ट बनूं नकोस ? अग देवाधर्माच्या कल्पना ह्या पोथ्या पुराणांतून किंवा देव–देवळांतून मुळींच अनुभवायला मिळत नसतात ! मी जी रोज देव–दर्शनाला जात होतें किंवा अजूनहि जाते, ती काय देवाकरितां? नाहीं; तर देवळांतल्या दैत्याकरिता. माझा सात जन्मीचा दावा साधणाऱ्या त्या पापी मैंदाकरितां–खोटं नांव धारण करणाऱ्या त्या धर्मलंड पुजाऱ्याकरितां—!

इंदिराः —( साश्चर्य ) म्हणजे ? आई, बटोबा पुजारी कां आमचे–?

वारणाक्काः—( ताडकन् उठून ) चूप ! खबरदार जर त्या धेड्याला "बाप" म्हणशील तर ? त्याच्या पापाचा घडा भरला,–नाहीं फुटला किंवा तो आतां मेला; तरी पण मी माझ्या कपाळाचं कुंकू म्हणून मुळींच

पुसणार नाहीं ! जाऊं दे. सोड हा विषय ! तूं स्वयंपाक पाण्याला लाग ! मी बऱ्याला सोडवून आणत्यें !

( म्हातारी तडक चेंचलेला बाळकृष्ण घेऊन जाते. )

इंदिराः—कोण ही चमत्कारिक घटना ! हें आमचं जन्मरहस्य कीं पितृधर्मरहस्य ! आणि याला कारण म्हणजे आईच्या अनुभवानं द्रव्येषणा ! पण ही तर मनुष्यमात्रांमध्यें अगदीं नैसर्गिकच असत्ये ! तर मग सध्यांच्या मानवी मनाची ठेवणच बदलल्याशिवाय, हिचं उच्चाटण कसं होणार ! नि कोण करणार !

राग–पराग; ताल–धुमाळी

**द्रव्य-हिना द्रव्य-चिंता । द्रव्य-तृष्णा कोण सोडी ॥ धृ० ॥ देव-दैत्यां द्रव्य लढवि । मानवा ने स्वार्थ-डोहीं ॥ १ ॥ धर्म अर्थीं, मोक्ष कामी । मुक्ति चारी जीव वांच्छी ॥२॥ मानवी जीवित चाले । वेद-मुर्खांचा धर्म बोले ॥ ३ ॥**

[ पडद्यांतः–आजीबाई घरांत आहेत कां ! ]

वटोबाः—( प्रवेश करून ) कां, कुठं स्वैंपाक-पाण्याला गेल्या आहेत वाटतं !–आणि तुम्ही केव्हां सुटून आलांत बुवा ! कां हो ! बोलत कां नाहीं ! म्हातारीनं जीवबीव तर दिला नाहीं ना ! हो, सध्यां सुरू आहे देवस्थानची झडती ! तेव्हां चोर सुटून संन्याशीच फांशी जायचे ! बरं, आमची यल्ली आली होती कां इकडे ! तुम्ही म्हणे तिला मास्तरीण करणार अहांत ! पण सांभाळून रहा बरं ! तुम्ही तिला मास्तरीण करायला जाल खऱ्या; परंतु ती मैना, मास्तरीण तर मुळींच होणार नाहीं. मात्र तुमच्या हातांत " माळ परडी " देऊन ती तुम्हांला आपल्यासारखी देव-दासी करून सोडील ! अहो, बोलून चालून या जोगतिणीच्या पोरी ! घटकेंत देवदासी बनतील; तर लगेच घटकेनं बोहारणी बनून जुना चोर-बाजार पहातील ! बरं तितकाच एखादा गुलछबू नादीं लागला तर,—

इंदिराः—शास्त्रीबुवा ! हें देवदासीचं घर नव्हे बरं कां ? आणि जरा जिभलीला लगाम लावून नीट मुद्यावर या म्हटलं !

बटोबाः—ठीक आहे ! तर मग आतां चंची सोडूनच मी मुद्याला गांठ घालतों ! ( तसें करीत ) हं, हातांत सुपारी घेऊन, तोंडांत ही देवाची लवंग धरतां कां ? बघा ! चांगली दाणेदार असून, देवाच्या मुंडावळींतून कांटा गळून पडली आहे ! घ्या गोड मानून ! छे, बुवा ! अतीच तुम्ही लाजऱ्या दिसतां ? अहो नवरा मेल्यावर अशी लाज धरून कसं निभवणार ? चांगलं देवदेव करीत देह सार्थकी लावायच्या प्रयत्नांत राह्यचं सोडून, असं घरांतच देवपूजा करीत कुठपर्यंत हें असं राहणार ? अहो, ताई ! अमंगल ओवळ्या संसारांतून नवरा एकदांचा उठून गेल्यावर, सोवळ्यानं जर देवदेव करीत हिंडायचं नाहीं; तर मग तुम्ही बालविधवा तरी राहतां कां ?

इंदिराः—पण काय हो, शास्त्रीबुवा ! तुम्ही कधीं संसार केलेला आहे कां ? तुम्हांला बायका-मुलं असतीलच !

बटोबाः—छे ! छे ! मी जन्मतांच बालब्रह्मचारी होतों ! आणि आतां वृद्धापकाळींहि पण तेंच व्रत नाईलाजानं म्हणून करावं लागतंय !

इंदिराः—( साश्चर्य ) म्हणजे ? ! तुम्हीं कधीं लग्नच केलेलं नव्हतं ?

बटोबाः—हं, माझं लग्न असं झालंच नाहीं ! फक्त एकदां लहानपणीं आईबापांच्या आग्रहावरून कांहींतरी झालेलं आठवतंय ! आणि मला वाटतं, कीं कांहीं एकदोन पोरं होईपर्यन्त मी लग्नाचा संसारहि पण थोडाबहुत केलेला असावा, असं आठवतंय ! तरीपण एकंदरींत संसारांत कांहीं राम न वाटल्यामुळं, मी सध्यां या पारमार्थिक संसारांत राधाकृष्ण करीत कसाबसा एकएक दिवस ढकलतोय झालं !

इंदिराः—बरं पण काय हो, शास्त्रीबुवा ? तुम्हांला जीं एकदोन मुलं झालीं म्हणतां, तीं सध्यां कुठं आहेत ? आपल्या कुटुंबाची कांहीं वास्तपुस्त—?

बटोबाः—अहो, कसलं कुटुंब नि कुठलीं पोरं ! म्हटलंच आहे कीं, " कां तव कान्ता कस्ते पुत्रः संसारोऽय मति विचित्राः । " तेव्हां देवाचं

नांव घेऊन, दिली झालं आज पंधरा-वीस वर्षांपासून सोडून ! कारण, संसार साधणाऱ्या या आपल्या लग्नसंस्थेबद्दल माझं मत तितकसं कांहीं अनुकूल नाहीं ! मात्र परमार्थ करतां करतां या दोहोंचा मिलाफ, तुम्हां आम्हांना फार चांगल्या तऱ्हेनं करतां येणं शक्य आहे ! म्हणजे असं, खालच्या मागासलेल्या वर्गांत जशा आपापल्या पोरीबाळीं देवाला अर्पण करण्याची गोड चाल आहे ना ? तशीच ती आतां आपण उच्चवर्णीय ब्राह्मण जातीनं सुरूं केली पाहिजे ! तेव्हां त्या दृष्टीनं जर ठरवायचं तर माझ्यामतें, पोरबाळं हीं देवीला बळी द्यावीत ! लेंकुरवाळ्या बायका, श्रीविष्णुकडं सोपवाव्यात; कारण तोंच या सर्वांचा संरक्षक आहे ! गरोदर बायका, प्रजापति ब्रह्मदेवाकडं द्याव्यात ! झालं तर वांझोट्या सुवासिनी, कार्तिकस्वामिकडं, ओलीस म्हणून तात्पुरत्या पाठवाव्यात ! बरं, आतां राहतां राहिल्या आपल्यासारख्या ऐन पंचवीशींतल्या तरुण बालविधवा ! त्यांना राधाकृष्णाच्या नांवावर सोडून, म्हाताऱ्या झाल्या म्हणजे पांडुरंगाच्या सेवेला पंढरींत पिटाळून लावाव्यात ! नाहीं,—वाटल्यास त्यांनीं आधून-मधून पंढरपूर पाहिलं, तरी सनातनी पांघरूण मात्र अंगाबाहेर टाकूं नये ! आणि आतां शेवटचे शेलके तरणेबांड ब्रह्मचारी, यांना मात्र मारुति दत्ताकडं जायला सांगावं !

इंदिरा:—( संतापून ) शास्त्रीबुवा ! आतां तुम्हांला मात्र मला घराबाहेर जायला सांगावं लागेल—?

बटोबा:—आणि तुम्ही घरांतच राहणार ? अहो, सध्यां जग राहिलंय कुठं घरांत ! तें केव्हांनाच घराबाहेर पडून, साष्टांगनमस्कार घालीत भ्रमाचे भोंपळे फोडून राहिलंय ! तुम्ही देखील त्याच पंथाला लागलेल्या दिसतां ? नाहींपेक्षां घरांत बसून देवस्थान पंचकमेटीला नोटीस देण्याची ही बिजवरघाई, तुमच्याकडून होतीच ना ? कां ? बरोबर ओळखलं कीं नाहीं !

इंदिरा:—बस्स, पुरें करा शास्त्रीबुवा ! तुमच्या वाणीला सभ्यपणाचा अगदींच विटाळ दिसतोंय ! आणि माझ्या नोटीशीबाबत तुम्ही कांहींसुद्धां बोलूं नये हेंच उत्तम ! आणा ती माझी—द्या इकडं ! तो विषय खास तुमचा नव्हे !

**बटोबाः**—नाहीं कसा ! आमचाच ! खास आमच्याच मालकीचा हा विषय आहे ! आणि सकेशा ब्राह्मण बालविधवांचा विषय तर, आमच्या विषयांतला एक मोठा थोरला विषय आहे ! बाकीचे विषय सोडले, तरी पण मुख्यतः उद्यां आम्हांला स्वैपाकिणी–बायासुद्धां वेळेवर पाह्यला मिळायची मारामार पडणार आहे तुमच्या या नोटीशीमुळं ! तुम्हांला जर मंदिरप्रवेश हवाच आहे, तर मग अगोदर वेणी–दानाची तयारी ठेवा ! म्हणजे मंदिर–प्रवेशहि मिळेल,–देवहि पण भेटेल आणि आम्हीहि मग वेदोनारायण तुम्हांला पवित्र मानून हवं तेव्हां भेटूं ! सध्यां मात्र अंगाला खेटूंसुद्धां देणार नाहीं हो ! मग तुम्ही पुढं कुंकू लावा; नाहींतर गोपीचंदन भिजवा ! पण अगोदर सोंवळ्या व्हा ! हाच आमचा आग्रह !

**इंदिराः**—ठेवा तो तुमचा तुमच्या जवळच ! हं, शास्त्रीबुवा—

**बटोबाः**—तें कांहीं नाहीं ! आम्ही हा तुमचा आग्रह मुळींच चालूं देणार नाहीं ! सत्याग्रह करूं ! हत्याग्रही होऊन मरूं ! पण तुमच्या केसांना धक्का दिल्याशिवाय, आम्ही आमच्या शेंडीची गांठहि पण बांधणार नाहीं ! कुठल्याशा शंकराचार्यांनीं म्हणे आपल्या कोटीलिंगांच्या सांगतेकरितां, तुम्हां बाल-विधवांना तापल्या तव्यावर उभं करून, मुंडण–दिक्षेचं सत्र आरंभीलं होतं ! तसंच आतां आम्हां भटां–भिक्षूकांना हातांत कात्र्या धरून तुमच्या वेण्या, डोई वेगळ्या केल्या पाहिजेत ! नाहींपेक्षां उद्यां तुम्ही सनातन–धर्माचा केसानं गळा कापूं लागाल ! ( बटव्यांतील कात्री काढून ) बोला, उतरतां केंस, कीं लागूं कामाला ! !

**इंदिराः**—( संतापातिरेक ) आतां हा आपला फाजिलपणा बंद करून, मुकाट्यानं बाहेर होतां, कीं आपली शोभा करून घेतां ! चला, चालते व्हा इथून !

**बटोबाः**—नाहीं जाणार ! तुम्हांला संन्यासदीक्षा दिल्याशिवाय नाहीं जाणार ! तुम्ही बालविधवा म्हणजे सनातनी–सुधारक वादाच्या अंडकित्त्यांत सांपडलेल्या कोंवळ्या सुपारीप्रमाणं आहांत ! खालून बोथट बुडाचं पातं जर सुधारकांचं असेल, तर तिखट धारेचं तीक्ष्ण पातं, हें सनातन्यांचं तुमच्या शिरावर—

[ कात्री घेऊन तिच्या अंगावर चालून जात ] असं राहणारच !

**इंदिरा:**—( चवताळून ) हं, पाशवी माणसा ! दूरूनच या माकड-चेष्टा कर ! खबरदार, जर माझ्या अंगाला स्पर्श करशील तर ! अघोर-कर्म्या, अरे ! तुला कांहीं आई बहिणी पाह्यची संवय आहे कीं नाहीं ? राक्षसा–

**बटोबा:**—राक्षसा ! तर मग आतां बायका भ्रष्ट करून, त्यांन पळवायचं राक्षसी व्रत मी तुझ्यापासूनच सुरवात करतों !

[ इंदिरेला धरावयास जातो. ती " धांवा " " धांवा " म्हणत्यें, तोंच बटोबाच्या शोधांत असलेला कर्नल इन्स्टीट् पोलीसासह येतो. ]

**कर्नल इन्स्टीट्:**—काय गडबड आहे ? ( बटोबास पाहून ) कोण, बटोबा पुजारी ? आणि तुम्ही इथं कसे ? आम्ही तुमच्याच तपासांत आहोंत ! तिकडे देवळांत तपासणी चालली आहे आणि तुम्ही इथं ?

**बटोबा:**—होय साहेब ! मला इथं यावं लागलं ! ही पहा, या बाईनीं आपल्या मंदिर प्रवेशाबाबत तुम्हा पंचांना नोटीस–

**कर्नल इन्स्टीट्:**—( नोटीस हिसकावून घेत ) दिली असली, तरी तुम्ही कुठं पंच आहांत ? बटोबा, देवांच्या अलंकारांत आणि उपकरणांत बरीच अफरतफर झालेली आहे ! तेव्हां तुम्ही आतां आमच्याबरोबर चला म्हणजे मग पाहूंया काय तें ! ( इंदिरेला उद्देशून ) तुम्ही आम्हांला ही नोटीस दिली ?

**इंदिरा:**—( शांतपणें ) होय !

**कर्नल इन्स्टीट्:**—कां ?

**इंदिरा:**—केवळ अन्याय होतो म्हणून–!

**कर्नल इन्स्टीट्:**—कसला अन्याय–?

**इंदिरा:**—साहेब ! अन्याय नाहीं तर काय ? इतर जातींतल्या विधवा स्त्रियांना, देवळांत शिरून देवदर्शन खुशाल घेतां येतं ? आणि आम्हां उच्चवर्णीय ब्राम्हण सकेशांना मात्र, देवळांत शिरण्याचीहि मनाई असावी

कां ! सांगा, साहेब ! आपण तिऱ्हाईत अहांत ? या नियमांत कांहीं आपल्याला माणूसकी दिसतें कां ?

**बटोबा**:—( मध्येंच तोंड घालून ) यांत माणूसकीचा काय संबंध ! ही धार्मिक बाब आहे ! साहेब झाले तरी इथं काय करणार ?

**कर्नेल इन्स्टीद्**:—( तिरस्कारपूर्वक ) तुम्ही मध्यें बोलूं नका ?

**बटोबा**:—पण साहेब ! आपल्याच राणीनं जाहीरनामा काढून, आम्हां सनातन्यांना कायमचं निर्धास्त केलं आहे !

**कर्नेल इन्स्टीद्**:—तें आम्हांला समजतंय–माहित आहे ! तुम्ही आम्हांला आठवण देऊन शिकवूं नका ! ( इंदिरेस ) तुमचं म्हणणं बरोबर आहे ! परंतु धार्मिक सुधारणा घडवून आणण्याची तुमचीच आर्य–हिंदू-धर्म-पद्धत्ति,ही मुख्यतः प्रजासत्तात्मक,–प्रातिनिधिक स्वरुपाची आहे ! आणि म्हणून तर तुमच्या हिंदूधर्मानें, आजपर्यंत धमक्या किंवा जबर-दस्तीचा जोर जुलूम, ह्यांचा कधींहि पण बरा वाईट उपयोग केलेला दिसत नाहीं, तर उलट सूचना आणि मतपरिवर्तन, ह्यांचांच अवलंब त्यानें केलेला आहे !

**बटोबा**:—( मानभावीपणानें ) हं, बरोबर आहे, साहेबांचं म्हणणं म्हणून बरोबर आहे !

**कर्नेल इन्स्टीद्**:—( चिडून ) तुम्ही गप्प रहा ! मधीं बोलण्याची आम्हांला फार चीड आहे ! ( इंदिरेस ) तरी पण योग्य विचारसरणीचा अवलंब करण्याकरितां म्हणून एखाद्या मनुष्यावर जोर–जुलूम करून भल-तीच जबरदस्ती करणं, ही विचारसरणी मूलतः हिंदूधर्माला मुळींच मान्य नाहीं ! तेव्हां तुम्ही आम्हांला ही दिलेली चोवीस तासांची मुदत, फार कमी आहे ! अर्थात् तुम्ही पूर्ण विचार करा आणि आम्हांला सुद्धां थोडा विचार करूं द्या !

**इंदिरा**:—( निर्धारपूर्वक ) साहेब ! आमच्या विचाराचा निश्चय, हा कायमच झालेला आहे ! फार तर आपल्याला मी आणखी आठ दिवसांची विचार करायला म्हणून वेळ देऊं शकेन !

**कर्नल इन्स्टीद्ः**—हरकत नाहीं ! चालेल ! कारण, आपलीं ध्येयं पसंत करण्याचं स्वातंत्र्य असणं आणि त्या दिशेनें तसा प्रयत्न करणं, हें प्रजासत्ताक धर्मपद्धतीचं–हिंदू धर्माचं धोरण, धर्मांधर्मांतील वाद मिट-विण्यास आम्हांला मदत करील, असं वाटतं !

[ पडद्यांतः—दादा दादा–! मी नाहीं हो चोरी केली. ]

( वारणाक्काला पकडलेला असा एक पोलीस येतो.)

**इंदिराः**—आई काय झालं ग ? आणि हा बरोबर पोलीस कां ?

**वारणाक्काः**—बाळ, दुर्दैव माझं ! मला यांनीं पकडलं आहे !

**इंदिराः** —आग पण कां ? तूं थोडीच यांची कांहीं चोरी केली आहेस ?

**वारणाक्काः**—खरंच मी चोरी केली नाहीं हो ! ईश्वर साक्ष, तो सोन्याचा बाळकृष्ण माझाच होतां ! विचारा वाटल्यास या माझ्या मुलीला–

**बटोबाः**—( पुढं होऊन ) मुलीला काय विचारायचं ? इथून तिथून तुम्ही मारे सारेच चोर आहांत ! तरी म्हटलं, परवां लक्ष्मीच्या हातांतल्या हिऱ्याच्या बांगड्या कुठं चोरीस गेल्या ?

[ सी. आय्. डी. इन्स्पेक्टर, विश्वनाथ व बरोबर यल्ली प्रवेश करून.]

**यल्लीः**—अंहं–चोरीला नाय गेल्या ! तर या नाय कां त्या दिसी तुम्ही माज्या हातांत घातल्यांत ? बाबा, कां वो असं खोटं बोलतां ?

**कर्नल इन्स्टीद्ः**—( शिपायांस ) बटोबाला कैद करून, नीट पोलीस बंदोबस्तांत ठेवा !

[ बटोबाला कैद करतात. ]

**वारणाक्काः**—( बेभान होऊन ) करा मेल्याला चांगली शिक्षा ! माझं कुंकू विटाळणाऱ्या मांगा,–[ अंगावर म्हातारी धांवून जाते, तोंच विश्वनाथ तिला सांवरीत पण आश्चर्यचकित होत. ]

**विश्वनाथः**—हां–हां आई, हें काय ?

**कर्नल इन्स्टीद्ः**—( सी. आय्. डी. स उद्देशून ) तुम्ही या सग-ळ्यांना बरोबर घेऊन, आमच्या बंगल्यावर हजर करा ! ( तो जातो.)

**अंक पहिला समाप्त.**

# अंक २ रा.

—×—

## प्रवेश १ ला.

[ **स्थळः**—कर्नल इन्स्टीट्च्या बंगल्यापुढील रस्ता. वारणाक्का, विश्वनाथ व इंदिरा प्रवेश करितात. बरोबर पोलीस. ]

**विश्वनाथः**—( आईची समजूत घालीत ) आई, मनुष्यप्राणी हा हाडाचा दुष्ट नाहीं; तर त्याच्यांत दुर्बलता अधिक असत्ये ! आणि म्हणूनच तो न कळत पापप्रवीण बनत जातो ! तेव्हां अशा पापी माणसाकडे पाह्यचीहि पण आपली दृष्टी, ही नेहमीं सदयतेचीच असावी, नाहीं कां !!

**इंदिराः**—नाहीं ! ही तुझी समजूतीची शिकवणूक, जन्मतांच दुष्ट असलेल्या मनुष्यप्राण्याला मुळींच लागूं करतां येणार नाहीं ! कारण, तो सद्गुणालाच दुर्गुणी बनवून स्वर्गाची उंच चढण, अधःपाताच्या उतरंडीनं चढूं लागतो ! आणि म्हणून तर परमेश्वरानं, सर्पासारख्या कृतघ्न प्राण्याला देखील, विषाची देणगी देऊन निर्भय केलं आहे ! नाहींपेक्षां तुझ्या या दुष्ट हाडांच्या मनुष्य प्राण्यानं, दोरखंडाऐवजीं सापांचाच उपयोग केला असतां हो !

**वारणाक्काः**—बऱ्या, इंदूचंच बोलणं मला अधिक पटतं रे ! आतां हेंच पहा ना ! आपण कुणाच्या अध्यांत कां मध्यांत–! पण दैवानं हा पोलीस बरोबर देऊन, आज आपल्याला चक्करा घालायला लावल्याच आहेत कीं नाहीं, साहेबांच्या बंगल्यावर !

**विश्वनाथः**—( सद्गदित होत ) नाहीं,–आई ! तस्सं नव्हे ! अग, निराशा आणि हाल–अपेष्टा, अपराध आणि संकटं, ह्यांनीं ग्रस्त झालेल्या माझ्या सुशिक्षित बेकार–बंधूंना, आज जरी या आपल्या सधन देवालयांचे दरवाजे सताड उघडे करतां आले नाहींत; तरीपण आशाळभूत मानवी मनांतल्या निराशेवजा आशा–मंदिराचे दरवाजे मात्र, सर्वांसच कुणालाहि

पण मुळींच बंद करतां येणार नाहींत! कारण, "देव" आणि "देह," ह्यांच्यामधीं वर्ण–व्यवस्थाकारांनीं "देश" या शब्दालाच प्राधान्य देऊन, त्याच्या सांपत्तीक स्थितीवरच "देव–देह मंदिरांना" अधिष्टित केलेलं आहे! शिवाय असं पहा,—

[ गज्जल. ]

**मनुज-देहीं, ईश नटला!। हवी कशाला हीं मंदिरें मग ॥ धृ० ॥ गिरीकंदरीं, समुद्र-सरिता। स्थिर-चराला व्यापी मायें ॥ चराचरांचा साक्षी जाहला । चराचराला, साक्षी झाला ॥ पंचमहाभूतीं नुरे मग हवी कशाला हीं मंदिरें ॥१॥ न लागे "आदि"–"अंत" कुठला?। दश–दिशेला न "मध्य" लागे ॥ त्रिलोकींच्या ह्या समस्त जीवां। पुराण–प्रमाणीं विलासी तो गे ॥ २ ॥ शास्त्र–ग्रंथा, धर्म–पंथा। ऋषी–मुनींना थांग न लागे ॥ ब्रम्हानंदी "केवलात्मा"। विदेहीं जीविं विराजितो गे ॥ विदेही आत्मा 'विनाशी तो मग हवी कशाला? ही मंदिरें! ॥ ४ ॥**

इंदिरा:—वा! शाबास, भाऊ! बळी द्यायला काढलेल्या चारुदत्ता-प्रमाणंच तूं आपलं तत्त्वप्रतिपादन इथं अगदीं संगीत स्वरुपांत गावून, आईची पाल्हाळीय वेदांतपर समजूत करूं लागलास! बरोबर पोलीस आहे–हें विसरूं नकोस! तुला जें कांहीं "सिद्धान्त–अपासिद्धांत" पिंजून काढावयाचे असतील, तें आतां तूं खुशाल कसून साहेबांच्या पुढं काढित बैस! इथं आईला काय करणार बरं त्यांत? आधींच ती संत्रस्त झालेली! चल हो पुढं! शिपाईबुवा, न्या त्याला पुढं घालून? हा असाच छांदिष्ट आहे! रेंगाळला कीं निकाल! (सर्व गेल्यावर) देवा, या चालूं झालेल्या तुझ्या नाटकांत, आमचा शेवटच जर तुला कांहीं करावयाचा असेल, तर तो आतां असाच कर कीं त्यामुळें–

राग—दरबारी कानडा, ताल—झपताल.

**धर्म-संस्कृतिकरण सुफल हो, या जनां। राज-दंडाविना धर्म-संस्करण कां? ॥ होत ना कधिं तरी; भ्रांत या भावना ॥ ध्रु० ॥ धर्म-संस्थापना, कार्यसाधी मना। शील-संवर्धनीं। धर्म-गुण-साधना ॥ १ ॥** [जाते.]

[पडदा उघडतो. कर्नल इन्स्टीट् व एस्. बाळकृष्णन् हें अफरातफर झालेल्या देवसाधनांची व देवद्रव्याची लेखी पहाणी पडताळून करीत आहेत. जवळच सी. आय्. डी. इन्स्पेक्टर हा पूर्वीच्या टांगेवाल्याच्या वेषांत उभा आहे, असें दृश्य.]

**कर्नल इन्स्टीद्:**—My God ! ! देवांच्या अलंकारांत आणि उपकरणांत दोन अडीच कोट रुपयांची तूट ! म्हणजे फारच मोठी रक्कम आहे—!

**एस्. बाळकृष्णन्:**—सर, आपणच आतां हें पहा म्हणजे झालं—!

**कर्नल इन्स्टीद्:**—(ट्रस्टडीड दाखवीत) आणि आपणहि पण, आपल्या हें वडिलांचं ट्रस्टडीड वाचून जरा लक्षांत घ्या! (देऊन) देवस्थानची व्यवस्था वंशपरंपराधिन एखाद्या व्यक्तीच्या हातांत दिली, कीं त्याचं मग पर्यवसान हें असंच अफरातफरींत होत जाणार—!

**एस्. बाळकृष्णन्:**—अर्थात् अशा स्थितींत ट्रस्टी झाले तरी काय करणार ?

**कर्नल इन्स्टीद्:**—(निराशेनं) काय करणार ! "देवस्थानच्या लहान मोठ्या सेवाधाऱ्यांना होतां होईल तों, ट्रस्टींनीं कमी करूं नये—" हा या ट्रस्टडीडमधील राजे शारंगधररावनूनीं—म्हणजे आपल्या वडिलांनीं घातलेला नियमच मोठा चमत्कारिक आहे ! तेव्हां आतां बटोबा पुजाऱ्याला काय शिक्षा द्यावी, याची आम्हांला मोठी पंचाईत पडली आहे !

**एस्. बाळकृष्णन्:**—सर, यांत एवढं पंचायतींत पडण्यासारखं तें काय आहे बरं ! सरळ अपराध्याला शासन हें झालंच पाहिजे !

**कर्नेल इन्स्टीद्ः**— कबूल ! परंतु, अप्पासाहेब ! झालेली अफरातफर कशी भरून येणार ? शिवाय, उद्यांपासून तर आपला वैकुंठीचा उत्साह सुरू ! कोणी तरी अगोदर जबाबदार माणूस–

**एस्. बाळकृष्णन्ः**—सर, आम्हांला वाटतं ही उत्सवाची जबाबदारी चार दिवस आपल्या विश्वनाथावर सोंपवावी–!

**कर्नेल इन्स्टीद्ः**—( साश्चर्य भरांत ) पण विश्वनाथ हा बटोबाचा मुलगा कसा–?

**एस्. बाळकृष्णन्ः**—सर, हें काय गूढ आहे, तेंच आम्हांला अजून पुरतसं कळलं नाहीं ! तथापि, एवढं मात्र खरं आहे कीं, विश्वनाथाला होत चाललेल्या परिचयावरून, आम्ही फारच चांगल्या तऱ्हेनं ओळखतो ! त्यावरून आम्हांला त्याच्या स्वभावाची आणि वर्तनाची पुरेंपुर पारख झालेली आहे ! तेव्हां आपण कांहींहि शंका न घेतां, उद्यांपासून सुरू होणाऱ्या आपल्या देवस्थानच्या उत्सव–समारंभावर, देखरेख करण्याकरितां म्हणून, खुशाल आपण विश्वनाथाची नेमणूक करावी ! मात्र इतःपर त्या बटोबा पुजाऱ्याला–

**कर्नेल इन्स्टीद्ः**—काय करावं, असं आपल्याला वाटतं ?

**एस्. बाळकृष्णन्ः**—सर, आपण काय करायचं ठरविलं आहे ?

**कर्नेल इन्स्टीद्ः**—त्याला कांहीं दिवस असाच पोलीस बंदोबस्तांत ठेवून, त्याचा जिथं जिथं म्हणून कांहीं बरा वाईट संबंध आला असेल, तिथं तिथं शोध लावून, झालेली देवस्थानाची अफरातफर आपल्याला गुप्तपणानं पाह्यली पाहिजे ! संपूर्ण देवस्थानचा सगळा मुद्देमाल सांपडल्याशिवाय, बटोबा पुजाऱ्याला शिक्षा करतां येत नाहीं ! आणि म्हणून तर आम्ही आपल्याला त्या देवदासी पोरीला घेऊन, इथं बोलावणं केलं ! पाहूंया तिला कांहीं कमी जास्त विचारून, आपल्याला सुगावा लागतो कां ?

**एस्. बाळकृष्णन्ः**—ठीक आहे ! ( खूण करतो. टांगेवाला येऊन, यह्लीला हजर करतो व जातो. )

यल्लीः—' अर ए टांगवाल्याबाबा ' तुझा घोड्याचा टांगा, तसाच उभा राहु दे बघ ! मला आईकडं जायाची घाईच गर्दी हाय बघ !

टांगेवालाः—( तिला दाबित ) अग ए वरमाय ! गप्प बस की माज्या बये -! ( जातो. )

कर्नल इन्स्टीटः—( यल्लीस ) बाळ, तुझं वय किती ?

यल्लीः—( नैसर्गिकभाव दर्शवीत ) मला पदर येऊन, चार सा महिनं झाल्याती !

कर्नल इन्स्टीटः —( साश्चर्य ) म्हणजे काय ? !

यल्लीः—तें मला नाय ठाव ! मला लाज वाटते तें सांगाया– !

कर्नल इन्स्टीट्‌ः—बरं, तुझ्या आईकडं बटोबाचं जाणंयेणं किती दिवसापासूनचं आहे बरं ?

यल्लीः—मी जल्मायच्या अगोदर पासूनच माज्या आईकडं त्येचं येणंजाणं हाय ! मी त्येच्याच पोटची हाय ! म्हंजी त्यो माजा बा लागतो मला !

कर्नल इन्स्टीट्‌ः—तुझ्या आईचं कुणी नातेवाईक नाहीं ?

यल्लीः—त्यें मला ठावं नाय बगा साहेब !

कर्नल इन्स्टीट्‌ः—बरं, तुझी आई ही कधीं विश्वनाथरावाच्या घरीं जातयेत होती ?

यल्लीः—कंदीबी नाय ! आन् मला तरी त्येचं घर, कालरात्रीतक ठावं नव्हतं बगा साहेब ! आन् हें बगा साहेब ! माझी आई तर आज एक वरीस झालं, नुसती आथरूनाला खिळून निमताला मराया टेकलीया बगा साहेब !

कर्नल इन्स्टीट्‌ः—बरं, बटोबाला तूं कुठं आणखी कधीं जातांयेतांना पाह्यलं आहेस कां ?

यल्लीः—साहेब ! सतरा पिपळावरला त्यो अकरावा मुंज्या ! गांवांतल्या संमद्या मुरळ्या आन् जोगतिनी, त्येच्या वर्गीतल्या नव्हं ? अवो. एकदोन मुरळ्यांनीं तर त्येला एकदोनदां चांगलाच पायतणानं कुचलला व्हतां नव्हं ?

**कर्नेल इन्स्टीद्**:--( साश्चर्य ) कां ! !-कशाकरितां ! !

**यल्ली**:—अवो, माज्या एवढाल्या त्येंच्यापोरी, त्येनं कुटणीला नेऊन इकल्या म्हून !

**एस. बाळकृष्णन्**:--सर ! उगीचंच नाहीं मग देवांच्या अलंकारांत नि उपकरणांत, ही दोन अडीच कोट रुपयांची अफरातफर झाली ! बरं झालं लवकरच हा ब्रम्हसमंध सांपडला; नाहींपेक्षां त्यानं सर्व देवांचे दागिने लांबवून, वर सोन्याच्या उत्सवमूर्तीदेखील लांबविल्या असत्या !

**कर्नेल इन्स्टीद्**:—खरं आहे ! कारण, जो माणसांसारखी जिवंत माणसंसुद्धां वाईट मार्गाकडं लावून, त्याची देहविक्री करतो, तो उद्यां देवांनादेखील चोरून न्यायला भिणार नाहीं ! ( यल्लीस उद्देशून ) बरं, तुला कुणी भाऊबहिण ?

**यल्ली**:--साहेब मला आई बिगार कुनीबी नाय !

**कर्नेल इन्स्टीद्**:—बरं, तुझं आणखी कांहीं म्हणणं–वगैरे,–आहे ?

**एस्. बाळकृष्णन्**:—( यल्लीस) साहेबांना तुला जर आणखी कांहीं सांगावंसं वाटतं असेल तर खुशाल सांग बाळ ! मनमोकळं करून बोल ! इथं भिण्याचं मुळींच कांहीं कारण नाहीं बरं ! हं, सांग पाहू !

**यल्ली**:—सांगू तर मंग ! हं, हें बगा साहेब ! मला तेवढं शिक्षाण देऊनश्यान शहानं करा म्हंजी बस्स— !

**कर्नेल इन्स्टीद्** :—(न ऐकल्यासारखं) What does it means. काय म्हणत्ये ही ?

**एस्. बाळकृष्णन्**:—सर, ती म्हणत्ये,मला शिकायची इच्छा आहे !

**कर्नेल इन्स्टीद्** :—हरकत नाहीं ! जरूर तुला आम्ही शिकवूं !

**यल्ली**:—साहेब ! तुमी मला नग शिकवाया ! मी आपली इंदूताई-कडंच जाऊनश्यान दररोज शिकनार हाय ! तुमी मला तेवढी आपली म्हून पोसा म्हंजी झालं— !

**कर्नेल इन्स्टीद्** :—ठीक आहे ! जरूर तुला आम्ही पोसून शिकवूं! बरं पण तूं आतां, आंत जाऊन बैस पाहूं ! ( ती आंतील बाजूस जाते. पोलीस येतो त्यास ) कोण ? हो–येऊं द्या त्यांना आतां आंत !

[ तो जातो व सर्वांना घेऊन म्हणजे विश्वनाथ, इंदिरा व वारणाक्का ह्यांना घेऊन येतो व परत निघून जातो. ]

या—बसा—बसा असें ! विश्वनाथराव, आम्हांला फक्त तुमच्या मातोश्रीलाच थोडंसं कांहीं विचारावंसं वाटतं ! कारण, दुर्दैवानं आरोपी बटोबा पुजारी, हा तुमच्या घरचा प्रमुख माणूस—आय मीन तुमचे वडील निघाले आहेत ! तेव्हां तुम्ही दोघं बहिणभावंडं, अम्मळ जरा तिकडे आंत बसा!

( विश्वनाथ व इंदिरा आईला धीर देऊन आंत जातात ) बाई, बसा त्या खुर्चीवर ! आणि तुमचा पूर्वेतिहास जरा थोडक्यांत बोला बरं—!

**वारणाक्का**:—साहेब ! माझं मूळ माहेरघराणं, एका थोरामोठ्या महाराष्ट्रांतील संत घराण्यांतलं ! सध्यां ज्याला आपण आरोपी म्हणून पकडलं, त्याच्याशीं माझं लग्न, वयाच्या सातव्या वर्षी झालं ! माझं चालू वय सदतीस आहे. आणि आरोपीचं वय एकूणपन्नास असून, त्याचं खरं नांव "रंगनाथ" असं आहे ! लग्नाअगोदर आरोपी रंगनाथ, हा माझ्या माहेरी खांद्यावर बंदुक टाकून देवडीवर पहारा करीत असे; परंतु देवीच्या आजारांत माझी थोडीशीं सौंदर्यहानि झाल्यामुळं आणि आरोपी हा स्वज्ञातीचा गरीब मनुष्य दिसल्यामुळं,माझ्या आजानं पुढाकार घेऊन, सालंकृत कन्यादानानं माझी नि आरोपीची लग्नगांठ बांधली ! लग्नानंतर दोन मुलांचा संसार होईपर्यंत मी आरोपीबरोबर कसाबसा संसार केला,—पण पुढं मात्र,—( म्हातारी रडूं लागते ! )

**कर्नल इन्स्टीद**:—बाई, पुढं बोला ! कौटुंबिक हितसंबंधाचा आग्रह धरल्यामुळं, पातिपत्नीत्त्वाच्या ध्येयांत, उभयतांकडून कांहीं शैथिल्य तर उत्पन्न झालं नव्हतं ना ?

**वारणाक्का**:—नाहीं—नाहीं हो साहेब ! आमचं घराणं फारच शीलवंत म्हणून प्रसिद्ध आहे ! साहेब, दशपुत्राला जन्म देणाऱ्या स्त्रीचा गुणगौरव साक्षात् आमच्या धर्मानं सुद्धां 'आदर्श वंद्य माता' म्हणूनच केलेला आहे ! परंतु ही धर्माज्ञा तिकडून पाळणं झालं नाहीं ! माझ्या मातृत्त्वाला

लांसवट लावीचं स्वरूप मिळालं! महाराज, तें मी आतां कसं बरं पुन्हा या मुखावाटें उच्चारूं,—! ( रडूं लागते. )

कर्नेल इन्स्टीद्:—बाई, रडूं नका! भिऊं नका! मन मोकळं करून बोला पाहूं!

वारणाक्का:—साहेब, काय बोलूं नि किती बोलूं! माझ्या या दोन जीवांच्या प्राणावर जेव्हां कां हा बाप म्हणविणारा कसाई, व्यसनांच्या आहारीं जाऊन, आपल्या पोटच्या मुलांच्या मानेवर सुरा फिरविण्यास सज्ज झाला; तेव्हांच मग मी चिमणीप्रमाणें हे दोन प्राण घेऊन देशोधडी झाल्यें!

कर्नेल इन्स्टीद्:—( साश्चर्य ) तुमचा आणि बटोबाचा संबंध, आज किती वर्षांपासून सुटला!

वारणाक्का:—तब्बल पंधरा एक वर्षे तरी झाली असतील!

कर्नेल इन्स्टीद्:—तुम्ही इथं किती वर्षांपासून आहांत!

वारणाक्का:—उणं पुरं एक तप!

कर्नेल इन्स्टीद्:—तुम्हांला बटोबानं इतक्या दिवस ओळखलं नाहीं! तुम्ही तर दररोज नित्यनेमानं देवाला जाणाऱ्या—!

वारणाक्का:—आरोपीनं मला ओळखलं; पण तो ओळख-देख नसल्यासारखचं नेहमीं मला भासवीत असतो!

कर्नेल इन्स्टीद्:—बरं, तुम्हीं त्याला तशी कधीं ओळख करून दिली होती!

वारणाक्का:—नाहीं! दिली असती तर कदाचित् त्यानं माझा जीव देखील घेतला असता!

कर्नेल इन्स्टीद्:—तर मग आरोपी बटोबा, हा तुमच्या घरीं कधीं फारसा जात येत नव्हताच तर—!

वारणाक्का:—मुळींच नाहीं! कालच त्याला मी आलेला पाहिला!

कर्नेल इन्स्टीद्:—बरं, आरोपीच्या वर्तनावर तुम्ही कधीं बारकाईनं लक्ष दिलं होतं!

**वारणाक्काः**—साहेब ! आरोपीचं वर्तनच जिथं कसाबाप्रमाणं, मला त्याच्या जन्माची सोबतीण बनून, दुर्दैवानं पहावं लागलंय, तिथं तें आतां आणखी निराळं काय पाह्यचं बरं बाकी उरलंय ! ( रडूं लागते )

**कर्नेल इन्स्टीद्ः**—बरं, तुम्ही आतां खुशाल घरीं चला !

[ कॉलबेल वाजवितो, तोंच टांगेवाला, विश्वनाथ, इंदिरा, यल्ली प्रवेश करतात. ] ( इंदिरेस ) आम्ही तुम्हाला कांहींच विचारूं इच्छित नाहीं; तरीपण तुम्ही आमच्याकरतां म्हणून इला शिक्षण देऊन, चांगली हुषार करा ! हिचा सगळा खर्च हा आम्ही तुम्हांला दरमहा देत जाऊं ! या आतां आपण ! सिपॉय, ह्यांना आमच्या मोटारींतून घरीं पोंचवा ! विश्वनाथराव, तुम्ही तेवढें बसा इथं.

**यल्लीः**—अर ए टांगंवाल्याबावा ! घोडयाला बाईच तोबरा देऊनश्यान सोड जा त्येला आतां तबेल्यांत ! मी नाय येनार आतां तुज्या टांग्यांत; तर मोटारीतनंच इंदूताईच्या घरीं जाऊन, मंग मी माज्या आईकडं जाईन बरं कां साहेब ! !

[ वारणाक्काला घेऊन इंदिरा व यल्ली जातात. ]

**कर्नेल इन्स्टीद्**—( विश्वनाथास उद्देशून ) तुमचं भाग्य थोर म्हणून तुम्ही काल या देवदासीच्या साक्षीवरून वाचलांत; नाहींपेक्षां मोठा बिकट प्रसंग होतां तुमच्या आयुष्यावर ! पण देवाची कृपा कीं, तुम्ही निर्दोषी म्हणून सुटलांत ! तेव्हां तुम्ही आतां उद्यांपासून आपल्या सुरूं होणाऱ्या " वैकुंठ महोत्सवाला " प्रत्यक्ष कार्याची मदत देऊन अंगमेहनतीचं काम फुकटात केलं पाहिजे !

**विश्वनाथः**—साहेब ! जिव्हाळ्याचं काम करणाऱ्याला, मोबदल्याची अपेक्षा नसत्ये ! आणि साहेब-लोक तर कोणतंहि पण काम, कधींहि फुकटांत करून घेत नसतात असा त्यांचा लौकिक आहे ! तथापि, कृपा करून आपण या कामीं माझा उपयोग करून घेऊं नये !

**कर्नेल इन्स्टीद्ः**—( साश्चर्य ) कारण-! !

**विश्वनाथः**—कारण ! साहेब, " कारणं " अनंत आहेत हो-! तथापि, आपण मला माझा स्वाभिमान विसरून, उद्यां जरी पट्टेवाल्याची

कामगिरी बजावयास लाविली तरीसुद्धां यदाकदाचित् ती मी करीन; परंतु देवधर्म संस्थानच्या आस्मानी–सुलतानी व्यवहारांत जबाबदार कार्यकर्ता म्हणून लक्ष देणं, फारच धोक्याचं असं ठरणार आहे! उद्यांच माझ्या प्राणावर उलटणारं हें कृत्य, साहेब! आजच आपण मला कां करायला लावतां बरं?

**कर्नेल इन्स्टीद्**:—तुम्ही फारच भित्रे आहांत! तसेंच फाजील दूरदर्शी देखील दिसतां! आम्ही तुम्हांला वचन देऊन निर्भय करतों कीं, तुमच्या संरक्षणाची सर्व जबाबदारी, आम्ही आमच्या स्वतःच्या प्राणाइतकीच घेत आहोंत, समजलं?

**विश्वनाथ**:—हरकत नाहीं, पण साहेब! आपण मला भित्रा अगर फाजील दूरदर्शी जरी ठरवीत असला; तरीपण मी तो आतां अनुभवानं तसा बनत चाललों! शिवाय, मूळचा पडलों कर्मदरिद्री,—

**एस्. बाळकृष्णन्**:—कर्मदरिद्री! कोण कर्मदरिद्री!! विसूभाऊ, तूं स्वतःला कर्मदरिद्री समजतोंस!! हां, वेड्या! अरे कोण दरिद्री आणि कोण श्रीमंत? दोषी कोण? आणि निर्दोषी कोण? जगाला इकडे पाह्यला फुरसत आहे कुठं? तथापि, ही गोष्ट मात्र खरी आहे कीं, अखिल विश्वाला तारणारा पवित्र आत्मा, कधींकाळीं जर या भूपृष्ठावर अवतरणार असेल, तर त्यानं आत्यंतिक दरिद्री आईबापाच्याच पोटीं जन्म घेतलेला शक, भावी बखरकारांना नमूद करून ठेवावा लागेल! (पाठीवर ममत्वानें हात मारीत) शाबास, विसूअण्णा! अवघ्या चार दिवसांच्या दिलेल्या उत्सव कामगिरीकरितां जर असें डरतां, तर मग उद्यां देवस्थान संस्थानचीं सगळीं "अन्नछत्रं" नि "सदावर्तें" आपल्या ताब्यांत आल्यावर कितपत गाळण उडणार आहे–? (खिशांतून बिलाचा मसूदा काढीत) सर, विधिमंडळापुढं आजच हें बिल आम्ही रवाना करणार आहोंत–!

**कर्नेल इन्स्टीद्**:—(वाचून) हा खरा सनदशीर प्रयत्न! बिलाचा हेतू शुद्ध आहे! जरूर तुम्ही पाठवा! तसंच, या कामीं तुम्हांला आमचीहि सहानुभूति म्हणून, तुमच्या "सुशिक्षित बेकारी निवारक–मण्डळाला"

प्राथमिक मदत म्हणून आम्ही आपल्या पगारांतून दरमहा तीनशें रुपये अविच्छिन्न देत जाऊं ! आणि उरलेल्या पांचश्यांत आम्ही आमचा प्रपंच काटकसरीनं करायला शिकूं ! तेव्हां चॅरिटी बिगिन्स ॲट् होम—धर्मादाय कृत्यांत स्वतःच्या घरांतूनच मदत करा,—या न्यायानं आम्ही ही तीनशें रुपयांची रक्कम आतांच आगाऊ तुमच्या सुपूर्द करीत आहोंत ! ( विश्वनाथाला तीनशें रुपयांच्या नोटा देऊन ) दरमहाच्या दरमहा येऊन, तुम्ही ही रक्कम घेऊन जात चला ! विश्वनाथराव, आतां तुम्हांला शेवटची विनंति ही करावीशीं वाटतें कीं, " हिंदू रिलिजन् इज युनिव्हर्सल् टू दि ह्यूमन रेस,—हिंदूधर्म हा मानवी वंशाइतकाच विश्वव्यापी आहे,—आणि त्यांत विभूतिपूजनाला मान्यता दिलेली आहे ! आणि ही मान्यता म्हणजेच सगुणोपासनेचं—भक्तीचं—खरंखुरं स्वरूप आहे ! साधूच्या पावित्र्या-इतकीच प्रेमळ पत्नीची पतिनिष्ठा, किंवा बालकाचा अनागसपणा, ह्यांची सगुण परमेश्वराच्या दरबारांत सारखींच योग्यता आहे ! आणि म्हणून तर हिंदूधर्मांत उत्सव—प्रीयतेला फार महत्त्व आहे. अर्थात् वैकुंठ उत्सावाची कामगिरी तुम्हांला जातीनं पार पाडायलाच पाहिजे !

**विश्वनाथः**—ठीक आहे. आज्ञा प्रमाण !

**कर्नेल इन्स्टीद्ः**—आम्हांला अत्यंत आनंद झाला; कारण, तुम्ही आमचं ऐकलं ! परमताबद्दल आदर आणि सौजन्य दाखविणं, हें तुम्हां हिंदू लोकांच्या धर्माचं मोठं वैशिष्ट्य आहे ! आणि म्हणून तर परधर्मी-यांना आपल्या धर्मांत बाटविणं, हें हिंदूधर्मानं केव्हांहि आपलं कार्य मानिलं नाहीं, याचं कारण म्हणजे हिंदूधर्म हा मतापेक्षां आचरणालाच अधिक महत्त्व देणारा असा आहे !

**एस्. बाळकृष्णन्ः**—( स्वाभिमानपूर्वक ) केव्हांहि ! आमच्या हिंदु-धर्माचं वैशिष्ट्य, म्हणजे परधर्मसहिष्णुता ! आणि म्हणून तर इतरेतर धर्माप्रमाणं " एका हातांत गीता आणि दुसऱ्या हातांत तरवार घेऊन, हिंदूंनीं परधर्मीयांना आपल्या धर्मामध्यें ओढण्यासाठीं म्हणून अजून रक्ताचे पाट वाहविले नाहींत " !

**कर्नेल इन्स्टीद्ः**—नाहींत कधींहि नाहींत ! आणि पुढंहि पण तें

तसं होणार नाहीं ! कारण, भिन्न भिन्न उपास्यें आणि भिन्न भिन्न उपासनाविधि पाळणाऱ्यांना हिंदूधर्मामध्यें समाविष्ट करण्यांत आलेलं आहे ! शक, हूण, किरातादि पापीवंशांना आत्मसात् करून त्यांचा उद्धार केलेला आहे ! आणि म्हणूनच तर एकाअर्थी, हिंदूधर्म हा प्रचारकार्य अंगिकारणाऱ्या धर्माचं जगांतील पहिलंच उदाहरण म्हणून, आम्हां तिऱ्हाईतांना सुद्धां असं अभिमानानं बोट दाखवितां येईल ! आणि एवढ्याच करितां तर, जगांतल्या सगळ्या तत्त्ववेत्त्यांनीं "इंडिया इज ए लँड ऑफ् फिलॉसफी"–हिंदुस्थान ही तत्त्वज्ञानाची भूमि आहे,–अशीच सर्वांनीं एकमुखानं प्रौढी गायिलेली आहे !

एस्. बाळकृष्णन्ः—आणि ती शेंवटपर्यन्त अशीच गाईली जाईल ! सर, अध्यात्मिक जीवनावर उभारलेला आमचा हिंदुधर्म, असं प्रतिपादन करतों कीं, भिन्न प्रकृतीच्या लोकांना निरनिराळें धार्मिक अनुभव येत असल्यानें, त्यांचे उपासनेचे प्रकारहि पण भिन्न असणं, हें अगदीं अपरिहार्यच आहे !

कर्नेल इन्स्टीट्ः—बरोबर ! कारण, मनुष्याच्या आणि जगाच्या जीवनामध्यें "परमेश्वर" हें एक मध्यवर्ती सत्य आहे–! असें वाटेतोंपर्यन्त, ठरलेल्या उपासना मार्गांत, एका पाठी मागून एक असे निरनिराळे दृष्टांत सुचत असतात ! "माझ्या बागेंतील रोपं, ही ईश्वरानं लाविलीं हायट–आणि माज्या शेजाऱ्याच्या बागेंतील रोपं, हीं रोपं नसून, "तण" हायट !–आणि ती सैतानानं लावलेली हायट ! तीं कांहीं झालं तरी नष्ट केलींच पाहिजेत–!" असल्या जीवनाच्या द्वैती–धोरणापासून उत्पन्न झालेली ही विचारसरणी, हिंदुधर्म हा मुळींच मान्य करीत नाहीं ! आणि म्हणून तर, लाख वेळां असं आमच्या मनांत येतं कीं, चित्ताची खळबळ शांत होण्याकरितां तरी, हिंदुधर्माचा स्वीकार करून,–संन्यास घेऊन,–सांगोपांग त्याचा अभ्यास करावा !

[ टेलिफोन घंटा. ]

हॅलो—! हां–काय ? बटोबा पुजारी पोलीस बंदोबस्तांतून फरारी– ! पण तो कसा—!

## प्रवेश २ रा.

( स्थलः—देवस्थानाबाहेरील रस्ता. एस्. बाळकृष्णन् व विश्वनाथ प्रवेश करितात.

**एस्. बाळकृष्णन्ः**—वा, विश्वनाथराव ! चांगली अनायासें कार्य करण्याची संधि मिळाली, तरी देखील चेहऱ्यावर उदासीनताच ! तें कांहीं नाहीं ! सुशिक्षित बेकार म्हणविणाऱ्यांनीं, पडेल तें काम करायला, आतां तयारच झालं पाहिजे ! ( किंचित् हास्य दर्शवीत ) आपण आपल्या मनाची तयारी एवढी करून बसलों आहोंत बुवा ! करायचंच काय !

**विश्वनाथः**—बाळकृष्णपंत, आपण थोर आहांत-आपलं अंतःकरण सुविद्य असून आपण विश्वविद्यालयाचे पदवीधर आहांत-!

**एस्. बाळकृष्णन्ः**—( उसासा टाकून ) नांवाला विश्वविद्यालय; पण त्यांतून बाहेर पडल्यावर तर मात्र संपूर्ण पोटाचीच भ्रांत ! विश्वनाथराव, विद्यार्जनाच्या निमित्तानं आजपर्यंत विद्यापीठांनीं जेवढा व्यापार करून पैसा मिळविला तितका तो अन्य कोणत्याही पण व्यापारानं अद्याप मिळविलेला नाहीं ! मग उगीचंच मला पदवीधर म्हणून कां हिणवितां बरं !

**विश्वनाथः**—नाहीं, पंत ! मी तुम्हांला खरोखरीच हिणवीत नाहीं ! कारण, बुद्धिमान् आणि चारित्र्यवान् माणसं, ही कुठंहि जरी दडवून ठेविली अगर राहिली, तरी पण ते आपला प्रभाव, मार्गदर्शक होऊनच दाखवीत असतात ! मग जनसमूह अल्प असला, तरी आपोआप ते वर आल्याशिवाय राहात नाहींत ! आपली बरोबरी, मला गरीबाला कुठून करतां येईल बरें !-

**एस्. बाळकृष्णन्ः**—गरीब आणि श्रीमंत ! विश्वनाथराव, कर्तव्य-कर्मोतील ही भिन्नता नष्ट करणं, आज तुम्हां आम्हां सामान्य माणसांना मोठं धाडसाचं असं कार्य होऊन बसलंय ! कारण, विकासाचा प्रत्येक मार्ग स्वतंत्र असून, त्याला कांहीं तरी वैशिष्ट्य हें आहेच ! एकाच

मार्गाचा अवलंब करायला जावं, तर दुसऱ्या मार्गावरील लक्ष उडून, तिसऱ्याच मार्गाकडे आशाळभूत दृष्टीनं पहावंसं वाटतं! फार कशाला, आपल्या सर्व तरुण मनांच्या वेड्या आशेनं, सध्यां असं घेतलं आहे ना,— कीं आपण जनतेचीं जुलमीं बंधनं तोडावींत, त्याचं अज्ञान नष्ट करावं,— त्यांचा स्वाभिमान वाढवावा आणि त्यांस उत्तम जीवन व्यतीत करण्याची संधि साधेल, तसें अनेक लोकोपयोगी मार्ग खुलें करावेत; परंतु तसं करतांना देखील, बुद्धिमान् आणि मूर्ख, समर्थ—योजक आणि सांगकाम्या —मजूर, ह्यांच्यामधील भेदमात्र, आपण नष्ट करूं शकूं, अशा भ्रमांत केव्हांहि पण राहातां कामा नये! आणि अर्वाचिन लोकसत्ताक पद्धतीचा कल पाहिला, तर सर्व माणसं, सर्वांशानं सारखीच लेखण्याकडे आहे; परंतु सर्वांशानं सारखी माणसं मात्र कोठेंहि नसतात, हा या दुर्दैवी जगांतला कडू अनुभव आहे!

**विश्वनाथः**—होयना? मग मी आता अनुभवानंहि उदासीन राह्यला शिकू नको! पंत, आपल्याला आणि साहेबांना माझ्या शुद्ध अंतःकरणाची जशी परिक्षा झाली, तशी ती इतरत्र लवकर होणं शक्य आहे काय? प्रत्यक्ष जन्मदाता पिता—! अरेरे, ब्राह्मण म्हणजे विचारवंत,—वर्णाश्रम-धर्मांतल्या सद्गुणांचा प्रतिनिधि! पण कृतीनं पाहिला तर कर्मचांडाळ! पंत, हें दुर्दैवी नग्नसत्य आहे हो—!

**एस्. बाळकृष्णन्ः**—असेल! पण विश्वनाथराव, जेव्हां आपण दुर्दैवी सत्याची घोषणा, मनुष्याला निमित्तमात्र धरून करीत असतों, तेव्हां मात्र तो नारायण म्हणूनच,—

**विश्वनाथः**—देवपदीं पोहचत असेल! नाहीं असं मी मुळींच म्हणत नाहीं! कारण, परमेश्वरविषयक आपल्या ज्ञानांत उत्क्रांति होत असत्ये, या तत्त्वावर माझा विश्वास आहे! आणि उद्यां सत्याच्या गाभाऱ्यांत प्रवेशकरीतोंपर्यंत, आपल्याला परमेश्वराविषयक कल्पना, कदाचित् एकसारख्या पुढंमागं बदलाव्या देखील लागतील! बाळकृष्णपंत, सगुणोपासनेचं महत्त्व, मी फक्त निर्बुद्धाकरितांच मान्य करायला तयार आहें!

**एस्. बाळकृष्णन्ः**—आणि ज्ञातवंत विचारी मंडळीकरितां!!

**विश्वनाथः**--ती सगुणोपासनेला फारसं महत्त्व देत बसणार नाहीं! त्यांतल्या त्यांत, ब्राह्मण म्हणविणाऱ्यांनीं तर या फंदांत कधींच पडूं नये!

**एस्. बाळकृष्णन्ः**--( साश्चर्य ) कां-! -कारण!!

**विश्वनाथः**--कारण! कारण, देवत्त्व स्थापण्याचाच त्यांचा अधिकार आहे! ज्या प्राणप्रतिष्ठित मूर्तींत, जो स्वतःच्या आत्मसाक्षात्कारानं, देवत्व आणूं शकतो,-निर्माण करूं शकतो,-तो केव्हांहि आपलं लक्ष सगुणोपासनेंत घालणार नाहीं!-आणि तो जर तसा पुरवूं लागला, तर त्याचा अधःपात हा ठेवलेलाच आहे-!

**एस्. बाळकृष्णन्ः**—याला पुरावा आणि दृष्टांत-!

**विश्वनाथः**—मी आणि माझे वडील-! बाळकृष्णपंत, या सगुणोपासनेच्या फाजील अतिरेकामुळं, आज देवधर्म संस्थेंत कितीतरी अनागोंदी कारभार बोकाळून, मूळ उद्देशाचं विकृत स्वरूप कसं हिडिस प्रमाणांत पाह्यला मिळतंय हें आपण सध्यां पहातच आहोंत! "जें आपल्याला प्रिय, तें देवालाहि प्रिय,-" या भाविक बोलण्यांत मला तर निव्वळ भामटेगिरीच दिसूं लागते! ईश्वरस्वरूपीं सगुणोपासनेच्या कल्पनेंत, एक-जात सारे व्यसनी नि ऐदी लोकांचे तांडेच्या तांडेच रममाण झालेले पाह्यला मिळतात—!

**एस्. बाळकृष्णन्**—पण कित्येक हिंदुधर्म द्रष्टयांना, आत्म साक्षात्काराचे जे उच्च आणि विपुल अनुभव आले, ते मात्र या सगुणोपासनेमुळंच, नाहीं-!!

**विश्वनाथः**—होय! दिव्यशक्तीच्या मूर्त स्वरूपाची कल्पना करणं, कधीं कधीं बुद्धिला आत्यंतिक अवश्य असं होतं,—!

**एस्. बाळकृष्णन्**—होय ना! तर मग सगुणोपासना आणि पारमार्थिक कल्याण, या संबंधीं तुमचीं आमचीं मतं कांहींहि जरी असलीं, तरीपण आपण दयाळू आणि प्रामाणिक असावं, आपल्या उपकारकर्त्याबद्दल आपण कृतज्ञताबुद्धि दाखवावी आणि दुर्दैवी मनुष्यांशीं सहानुभूतीनं वागावं, याबद्दल तरी आपलं एकमत होऊं शकेल ना!

**विश्वनाथः**—नुसतं एकमतच नव्हे, तर एकजीवि देखील व्हायला मी तयार आहे! फार कशाला, उद्यां ज्या वैकुंठीच्या महोत्सव-समारंभांत, आपण सर्वांनीं मला प्रमुख म्हणून जबाबदारीनं पुढं केलं आहे, त्याचीच व्यवस्था मी अगदीं गरिबीशीं एकरूप होऊन करणार आहे! कारण, ह्याच उत्सवप्रसंगीं मागं माझ्या पोटाला किती तरी चिमटे बसले आहेत—! ( गंहिवरतो )

**एस्. बाळकृष्णन्ः**—( साश्चर्य ) तें कां? प्रयोजनाप्रीत्यर्थ, देवस्थान संस्थानचा दरसाल साठ हजार रुपयांचा चुराडा होऊनहि पण अन्नार्थ्याला अन्नदान मिळत नाहीं, म्हणतां—!

**विश्वनाथः**—नाहीं! अन्नार्थ्याला अन्नाचा कणहि भेटत नाहीं! पंचपक्वान्नांचीं सहस्त्रभोजनं आणि उत्सवांचीं प्रयोजनं, ह्यांच्याद्वारें होणाऱ्या अन्नदानाचं माप, हें नेहमीं मस्तवाल्यांच्याच पदरांत पडत असतं आणि खरें अन्नार्थी जीवमात्र, उपाशींच मरत असतात! देवांचा महाप्रसाद, "गजगे—" विटीदांडूंच्या खरेदीकडंच मोठी आणि भाविक म्हणून मिरविणारीं माणसं खर्ची घालीत असतात! हा आजपर्यंतचा—सर्वांचा असा अनुभव आहे. यापेक्षां आपल्या संस्थानांतील खेडयांतले "देव—भंडारे गांव भोजनं म्हणून अधिक आस्थेनें केलीं जातात!

**एस्. बाळकृष्णन्ः**—( विचार करून ) अस्सं! ठीक आहे! तर मग आपणहि उद्यांपासून, अशीच दक्षता घेऊं या! देवाचा प्रसाद, पायधूळी किंवा इकडे तिकडे नासधूस म्हणून होऊं द्यायचा नाहीं! बरं, उदईक जमल्यास आपण हा विचार, तुमच्या घरींच करूं! घेऊं या तर आतां परस्परांचा निरोप! ( घड्याळ पहात ) अरे, साडे आठ झाले! काय हा काळोख इतक्यांतच पडत चाललाय पहा! चला, अगोदर घर गांठा पाहूं! गुड्इव्हिनिंग— ( जातो. )

**विश्वनाथः**—कां कीं, कुणास कळे; पण आज दोन दिवस माझं जें हें "वंश भारत" सुरूं झालं आहे, तें पाहून तर, माझ्या मनाचं स्वास्थ्य, पार विघडूनच गेलं आहे! पितृपर्वांतल्या एक एक हृदयद्रावक गोष्टी ऐकून तर माझी कंबरच खचत चाललीय—! निसर्गाची निर्घृणता

आणि ईश्वराचं दयाळुत्व, ह्यांचा मेळ घालूनच संपूर्ण अधःपाताची आणि मोक्षाची कल्पना, या विश्वांत कुणी तरी फैलावलेली दिसत्ये ! कारण, अगदीं नीचांतल्या नीच माणसांत देखील, दैवीगुण गुप्तपणानं दडलेलें पाह्यला मिळतच असतात ! म्हणजे अत्यंत पापी गणलेल्या मनुष्याला सुद्धां, परमेश्वराचा आधार हा असतोंच ! हो—नाहींपेक्षां, लोकांना पिळून काढणाऱ्या पापी मनुष्याच्या अंतःकरणांतील दैवीगुण जागृत करण्याच्या कामीं जगांतील जीतेंद्रिय महात्म्यानीं तरी स्वतःला मग कां बरं वाहून घेतलं असतं ?

राग—मिश्रकॉफी, ताल—त्रिताल.

**स्वार्थी, विषयी, जडमूढा, मलिना ! । गणिति बुध-**
**जन ॥ आत्म—स्वरुपीं । दृष्टी क्षमा-शील, पापी पतना ॥धृ०॥**
**नश्वर ते परि, ईश्वर झाले । ईश्वरता मग मानवीं खेळे ।**
**विश्व—चिंतनीं साधु—छळणा ! ॥ १ ॥**

[ **पडद्यांतः**—"चूप रहो, बेहाया चूप रहो—" बटोबा पुजारी पठाणी वेषांत यह्लीची मुस्कटदाबी करून, तिला लळत लोंबकळत पण बांध-लेल्या स्थितींत प्रवेश करतो ! विश्वनाथ सोडूं पहातो, तो त्याला धक्का मारतो. ]

**बटोबाः**—तुम आपने सीधि रास्तेसे चले जाव; वरना जानसे मौत होगी !

**यह्लीः**—( धडपड करत ) एवढं मला या मुडद्यापासून सोडा.—

**बटोबाः**—( तोंडावर हात ठेवीत ) अबे ए लवंडी, चूप रहो ! नही तो मुरगीके मुवाफिक तुझे अब काटके ले जाना पडेगा ! और क्या तो !

**विश्वनाथः**—लेकिन, नाहक क्यौं तुम उसीपर जोरजुलूम करते हो ! छोड दो उसे ।

**बटोबाः**—अबे, रावसाहब ! जोरजुलूम करनेवालोकी ऐसी तैसी । साला,—

**विश्वनाथः**—( धक्का मारून ) नाहीं तुझा बाप !–जरा मुह समालके, सबकुछ कहो !

**बटोबाः**—भाऊसाब !–हम क्या मोफतमें थोडीहि जबरदस्ती करते हैं। मैने तो इसे अब्बी खरेदीकरके लाई हैं।

**विश्वनाथः**—( साश्चर्य ) खरेदीकरके लाई हैं – !–याने !

**बटोबाः**—याने बेचन ली है ! इसीके माने हमे बेच डाली है।

**विश्वनाथः**—क्यौं ! किसलीये–!

**बटोबाः**—वो पुछनेकी हमे जुरूरत–! शायद वो भुकी मरते होगी !

**विश्वनाथः**—तुम्हारेपास इसीका बेचनखत हैं !

**बटोबाः**—हां, है ! यह देखिये ( कागद दाखवीत ) अब बोलो, यह साली नहीं आयी तों क्या मेरे सो रुपये खोकर चुपचाप बैठूं–!

**विश्वनाथः**—( खिशांत हात घालीत ) अच्छा ! तो तुम्हारे सो रुपये मैं अब्बी,–

**बटोबाः**—वो तुम आपनी जेबमेंहि रख्खो ! हमे पैसेकी क्या पर्वा है ! साले इसीपर हम चाहे जितने पैसे कमाइंगे ! डंकनरोडपर एक महिनाभर इस सालीको बिठाया, तो बस्स ! हमारे सब पैसे वसूल होंगे. आगे अरबस्थानका बझार तो इसीके लिये हरहमेश खुलाभी है–!

**विश्वनाथः**—होगा ! लेकिन इस बुरीत-हांसे, तुम यह बिलकुल अंजाम छोकरीको,–

**बटोबाः**—अबे, अंजामके मर्द बच्चे,–भली या बुरी–यह बात समझना, बिलकुलहि हिजडोंका काम हैं ! मर्दको मरदानी देना, यह मेरा बेपार है ! चल, निकाल ! तेरे जेबमें जो अब्बी दोसो रुपियां हो, तों मैं अब्बीके अब्बी इस लडकीको तेरे हवाले करतां हूं ! कमताकद बच्चे, बोल ! अरे हैं दोसो रुपिया,–!–

**विश्वनाथः**—हां, है ! ( २०० रु. नोटा देत) लो यह. अब छो दो उसे,–

**बटोबाः**—( मिस्किलपणें ) अब आपहि छोडो,–या वैसेहि गोदमें लेकर खुब खुषीसे दिलचमन करो ! आप अब, उसीके जवानमर्द

मालिक बन गये हैं ! मैं अब दुसरी कँही मिली,-तो देखनेकु जाता हुं ...( जाऊं लागतो )

**विश्वनाथः**—ठैरो ! इसीका वो बेचननामा कहाँ हैं ? ईधर लाईए।

**बटोबाः**—हां, लो यह। ( तो देतो ) असली इस बेचनखतमें हैं क्या ? ताकदमें जोर हो, तो ऐसी कोई लौंडिया मेरे घर धुंडते रहा,-देखा जायगा,-जरा समालके रहो,-तुम्हारे बेहनकोभी देखा जायगा-

[ निघून जातो. ]

**विश्वनाथः**—हरामखोरा-! पळाला ? आणि धर्मासाठीं हें नसतं विकतचं श्राद्ध,-! पण इथं थांबणंहि आतां अंमळ धोक्याचं दिसतं ! ( यल्लीच्या मुसक्या बांधलेल्या सोडून झाल्यावर ) चल, ऊठ पाहूं ! तुझ्या आईकडं ? मी आतां तिची चांगलीच खरडपट्टी काढणार आहे ? अग ही आई तुझी आहे कीं, जन्माचं मातेरं करणारी वेसवा आहे ?

**यल्लीः**—धनी-!-नका वो माज्या आईला वाईट साईट बोलून शिव्या देऊं ? मी तुमच्या पाया पडते,-पन माज्या आईच्या काळझोंपत त्या मला दिलेल्या नाय चालनार !

**विश्वनाथः**—बरं तर, चल ऊठ-! आईकडं येत्येस-?

**यल्लीः**—आईकडं नग तर ताईकडं ! मला इंदूताईकडंच न्या ! ( कापूं लागते ) मला आईकडं जायाला तर आज लई भ्या वाटतं ! आन साहेबांच्या बंगल्याहून मघांशीं मी घरीं येऊन पहाते, तो आईनें अक्क्षी तण्णावून दिलेली हाय. हालत बी नाय, बोलत बी नाय ! प्रेता-वानी गप्प ! मुडद्यावानी ताठ ! त्वांडाचं वासलंया बोळकं, अनि छातीचं वाजलंया जनुं बेलटं-?

**विश्वनाथः**—( भीत भीत ) म्हणजे-? यल्ले,-अग हें तूं बोलत्येस काय ?

**यल्लीः**—आई यल्लाम्माच्यानं ! आज माज्या आईला म्यां झोंपलेली पाहिली आन माणकेश्वरची सटवाई, माज्या आईच्या मुरतनवसाला

पावली,-असं वाटाया जीव घाबरतुया माजा! तवा आतां मला तुमच्या इंदूताईकडंच घेऊन चला! मी नाय येत माज्या घरीं! ( कांपते )

विश्वनाथः—पण माझ्याबरोबर तर येशील? तुझी आई जिवंत आहे कीं मेलीस? कां मारलीय,-हें नको कां कांहीं कळायला? शिवाय, तुझ्या या खरेदी-विक्रीची, ही काय भानगड आहे बुवा? तुझ्या आईला एकंदर मुलं, म्हणजे तुला बहिणी किती?

यल्लीः—देवास ठावं-!

विश्वनाथः—बरं, तुला आईनीं विकली कां?

यल्लीः—असं, त्यो मघांचा पठाण बोललाय खरं!

विश्वनाथः—अग पण तें खरं कशावरून?

यल्लीः—आई, बोलत नाय म्हून!

विश्वनाथः—अग पण तुला एवढी त्यानं मुसक्या बांधून तुझी बगोटी करीतोंपर्यंत तुझ्या आईची काय दांतखिळी बसली होती?

यल्लीः—आन् मी तरी त्येच म्हणत्ये कीं-! दांत इचकल्यावानी, आईनं डोळं पांढरं करून मला बांधतांना फायलं, पन माता माऊलीचं बोलनं म्हून नाय!

विश्वनाथः—( त्रासून ) म्हणजे वाचा तरी बंद कां पडली, हें नको कां पाह्यला-?

यल्लीः—ती मरतां बोल बी, बोलली नाय म्हून?

विश्वनाथः—अग हो! तेंच मी म्हणतोंय! आणि म्हणून तर अगोदर तुझ्या आईला भेटून, नंतरच मग आपण आपल्या घरीं जाऊं-?

यल्लीः—जकडं न्याल, तकडं येईन; पण माझ्या आईकडं,-नग ग बया-आई ग-! ( कांपते )

विश्वनाथः—अरेरे! तुला तर आतां चांगलंच कापरं भरल्यासारखं दिसतंय! न्वास हें प्रकरण फार निराळं झालेलं दिसतंय! यल्ले, साहेबांच्या सम्मतीशिवाय, तुला आतां इथूनच परस्पर घरीं नेणं, अम्मळ धोक्याचंच होणार आहे. त्यांतून, एका महत्त्वाच्या कामाला दिलेल्या साहेबांच्या

तिनशें रु. पैकीं दोनशें रुपयेहि पण मी आत्तांच तुझ्याकरितां म्हणून खर्च करून बसलोंय ! तेव्हां साहेबांना भेटूनच, मग आपण आपल्या घरीं,–

यल्लीः—( कांपतच ) मला आतां साहेबाकडं बी नेऊं नका ! घरीं नेऊन इंदूताईजवळ मला अगोदर झोपवा आन मग तुम्ही खुशाल साहेबाकडं जा ! पण जरा जल्दी करून मला इंदूताईकडं अगोदर न्या–!

विश्वनाथः—बरं, चल तर ! हात धरायलाच पाहिजे कां ? ( हात धरीत ) ठीक आहे ! बरं–पण घरीं गेल्यावर मी साहेबाकडं जाऊन, तुझी हकिकत त्यांच्या कानावर घालीतोंपर्यंत तूं इंदूताईजवळ झालेली सगळीं इत्यंभूत हकिकत सांगायची बरं कां !

यल्लीः—व्हय, संमदं सांगन ! आई मेली म्हून घरी आली–असं बी बोलन !

विश्वनाथः—( त्रासून ) यल्ले, अग जणुं काय खरोखरीचीच आई वारल्यासारखं, तूं हें मघांपासून काय बोकीत आहेस–? काय हें तुझं लफडं होऊन बसलंय नकळे ! बरं, चल प्रथम ताईकडंच जाऊं या !

[ विश्वनाथ तिचा हात धरून तिला घेऊन जातो; उलट बाजूनं वेषांतरित बटोबा पुजारी, वेष अविष्करण करीत करीत पुढं येतो. ]

बटोबाः—आहेस ! बापाला दोनशें रुपये मिळवून देणारा सुपुत्र शोभतोयस ! आणि दिसतोयस, ेट्या ! खरा समाज सुधारकहि पण दिसतोयस ? ( विकट हास्य ) पोरा, अरे एका कंगाल देवदासीकरितां जर तूं कडोसरीच्या दोनशें रुपयांच्या कोऱ्या करकरीत नोटा सोडल्यास; तर उद्यां तुझ्या त्या बहिणीवर मी जर असा एखादा सट्टयाचा आडमाप व्यापार केला, तर मग काय तूं मला त्रिभुवनाचं मोल देऊं शकशील ? ( विचार ) चला, पूर्व तयारी तर झोकांत गेली ! यल्लीची ब्याद दोनशें रुपये किमतीला स्वतःच्याच पोराला विकली म्हणजे शिल्लकेंतील बाकी बगलेंतच आहे ! तर आतां तिच्या आईचा-! तिच्या आईचा मुडदा तेवढा स्मशानांत नेऊन गाडायचं काम शिल्लक राहिलंय ! तेवढं केलं कीं, मग एकदम आज रात्रींच “ श्रीलक्ष्मी–नारायणावर हल्ला ! ”– ( पुन्हा विचार करून ) तो मी एकटा सहज करूं शकेन म्हणा; पण त्या

देवदासीच्या प्रेतावर एकट्यानं कसा काय हल्ला करावा बुवा ? निदान पांचामुखीं परमेश्वर या न्यायानं गेला बाजार पण जमेला पांच तर खरें ! आणि ते देखील स्मशानांत हल्ला करणारे ! ( आठवून ) अरे, हो ! छे, पण तिथं नकोच हें ! कारण, तो स्मशानवासी दर्म्याहि पण पडला चांगलाच ओळखीचा. तेव्हां, स्मशानाखेरीज त्या प्रेताची व्यवस्था लावायची तर–तर–! अस्सं !–म्हणजे लाखों लोकांच्या लावालावीनं न होणारं कार्य, आज त्या प्रेताकडूनच–हें असं करवून घ्यावं तर ? कधीं कधीं जीवंत माणसांपेक्षां, मेलेलीं मढींच जास्त कारणीं लागत असतात–! [ जातो.]

---

## प्रवेश ३ रा.

( स्थळः—विश्वनाथाचें घर. इंदिरा फणेरी-पेटी घेऊन केंस विंचरीत आहे व जवळच यल्ली अंकालिपी घेऊन पाटीवर बाराखड्या काढित आहे. वारणाक्का नंतर उत्सव-मंडपांत जाण्याच्या तयारीनिशीं येते. )

इंदिराः:—[ केंस विंचरीत. )

भावगीत

"स्फूर्ति पूर्ण गान रचुनि । टाकी भारोनी । काव्य-गायनीं ॥ धृ० ॥ जगण्याची भ्रांति पडे । प्रेत-कळा चोहीं-कडे ॥ दिसत लोचनीं ॥ १ ॥ नव-रस जरी सौख्य-कालीं । वीर रसाचि या काळीं ॥ काव्य-गायनीं" ॥ २ ॥

वारणाक्काः—( देवाला जाण्याच्या तयारींत प्रवेश. ) बाबे, तूं स्नान वगैरे लवकर आटप. झालं ! दोन दिवस तर माझ्या विसूनं चांगलीच उत्सवाची तयारी ठेविलीन ! अग, भुकेला म्हणून कुणाला देखील उपाशीं राहूं दिलं नाहीं ! तसंच, आपले बाळकृष्णपंत देखील हो ! इंदे, काल तर त्यांनीं हौसेनं पहिली पंगतच वाढली !

**इंदिराः**—होय कां ! तर मग आतां त्यांना आणि आपल्या भाऊला विधिमंडळाच्या येत्या निवडणूकीला उभं करावं, नाहीं !

**वारणाक्काः**—तें मला नाहीं कांहीं समजत ! पण अंगावर जबाबदारी टाकली, कीं ती पार पाडायची मात्र, दोघांच्याहि अंगीं कुवत आहे, एवढं बरीक दिसून आलं ! बरं, मी आतां इतक्यांत येत्ये हं ! पहातें उत्सव मंडपांत काय काय चाललंय तें ! एवढा उद्यांचा दिवस गेला म्हणजे या दोन पोरांनीं जिंकली ! ( यल्लीस– ) कांहीं या पोरीचं डोकं बरं आहे कां ! काय ग बाळ ! दिवसांतून किती पेन्सिली खातेस !

**यल्लीः**––आईसाब ! अव पेंन्सिली खायाला, त्या जवळ राहात्यांत कुठं ! संमद्या कुठं तरी हरवत्यांत बगा !

**वारणाक्काः**—हरवतील बाई ! माणसासारखी माणसं सुद्धां हरवतात, जवळ राहात नाहीं ! मग तिथं–! बाकी काय झालंय या पोरीच्या आईचं, देव जाणें ! कुणी कुठं पळविली ! कां भाजून मारली !– काय भुताटकीचा प्रकार झालाय नकळे ! बरं, तायडे ! चालूं द्या तुमचं काम ! आणि हें पहा, आपली ही बाळगोपाळाची जोडी, जर इथं आली, तर त्यांना खायला मी चुलीवर करून ठेवलेलं आहे ! नीट खाऊं घाल त्या दोघांना बरं ! ( जाते )

**इंदिराः**—( आंबडा बांधीत ) काय ग बाळ, बारासखड्याच काढत्येस ना ? ! कां आपली मुळाक्षराअगोदरचीं नुसतीं चित्रंच पहात बसली आहेस– !

**यल्लीः**––ताईसाब ! त्यादिसी त्या पठाणाला पाह्यलं आन् चित्रं पाह्यचं म्यां सोडलं.

**इंदिराः**—म्हणजे–! इतकी कां तूं अजुनहि धास्तावलेली आहेस ! पण, बरोबर ! बोलुनचालून आपण बायका ! फारसं बाहेर,–त्यांतून तुझ्यासारख्या मुलीनं तर फारसें हिंडणं–विशेष धोक्याचंच आहे ! तरीपण तूं त्या अंकलिपींतल्या "ल–" म्हणजे लष्कर या चित्राकडे दररोज लक्षपूर्वक पहात जा हं !

यल्ली—फायते ! संमदी परेटची " घागरा फलटण " हाय ! त्यांच्या त्या रंगीत दाढ्याबी, त्या पठानावानीच ठेवलेल्या दिसत्यात ! पन, ताई-साब, –"ल" म्हंजे लष्कर !–म्हंजी–काय वो ?

इंदिराः—अग लष्कर म्हणजे सैन्य-फौज ! तूं मघाशीं 'पलटण'असं जें बोललीस ना ? तेंच बरोबर असून, त्याला सैन्य-फौज-अशीं दुसरीं दोन नवीन नांवें आहेत ! नीट लक्षांत राहातील ना ?

यल्लीः—हो ! आन लष्करचा अर्थ लुटारू असाच घ्यायचा नव्हं- ! त्येस्नी काय दयामाया असत्ये कां वो ताईसाब ?

इंदिराः—हो सर्वांच्याच ठिकाणीं दया करण्याची शक्ती आहे ! आणि समज, एखाद्यावर जर जोरजुलूम व्हायला लागला, तर हेंच लष्कर त्याला सोडवून आणायला मदत करतें बरं ! तेव्हां आतां पठाणाला भ्यायचं कांहींच कारण नाहीं.

यल्लीः—पन हें बघा ताईसाब ! "ल" म्हंजे यल्ली-" तल्या " ल्ली" तला "ल" बी व्हईल नव्हं ?

इंदिराः—( हंसत ) बरोबर ! यल्ले, तूं फारच चाणाक्ष नि हुषार आहेस बघ ! पण आतां या दोन दिवसांत, बाकीच्या राहिलेल्या सगळ्या बारासखड्या संपविल्या पाहिजेस हो !

यल्लीः—दोन दिस कशाला ? उद्यांच काढत्ये कीं, संमद्यास्नी भरडून पन ताईसाब, माझी एक मागनी हाय बगा तुमच्याजवळ ?

इंदिराः—बोल ना ?

यल्लीः—माजं एवढं नांव बदला बगा अगोदर ! यल्ली-यल्ली– ! शेकचिल्ली पोरं तर मला बामणाची बिल्ली म्हूनच टारगटावानी आळींत हंसाया लागल्याती बगा ! तवा साहेबास्नी इचारून, माजं नांव बदला बगा तेवढं !

इंदिराः—हात्तेच्या–एवढंच ना ? बरं तर, उद्यींच आम्ही विचार करून, काय तें ठरवूं ! [ स्वतः कुंकू लावीत ]–पण तुला मी मात्र, यमू म्हणूनच हांक मारीत जाईन बरं !

यल्लीः—मंग मी बी साहेबास्नी बजावून, संमद्यांना हेंच नांव घ्यायला

लावीन बगा ! चालल यमू ! माजं नांव यमू–! ताईसाब ग्वाड हाय नांव ! ( हंसत म्हणून पाह्यला जर मान करत्ये तोंच इंदिरेनं कुंकू लाव-लेलं पाहून, साश्चर्य हंसत ) ऑं ! आन् ताईसाब ! हें काय ! आज तुम्ही कुकू लावलंया ! ( मिठी मारीत ) कां माजं नांव ठेवलं म्हून व्हय !

**इंदिराः**—हो ! तसंच बरं !–हो पण-यमू ! तूं अगोदर आपलं स्नान उरकून घे बरं ! आई घरीं परत यायच्या आंत, आपलीं स्नानं झालेलीं बरी !

**यल्लीः**—( आंत जात जात ) पन आईसाय आलं, तरी तुमी आजच्या दिस, हें लावलेलं कुकू पुसायचं नाय बरं कां !

[ विश्वनाथ व एस्. बाळकृष्णन् प्रवेश करितात. ]

**विश्वनाथः**—काय पुसायचं नाहीं ?

**यल्लीः**—( मागं वळून ) ऑ तुमाल्री मला नाय काय पुसायचं ! तर इंदूताईनं आज कुंकू लावलंया, तें पुसू नका म्हून म्हनत्ये, आन् आंत जात्ये. ( जाते )

**इंदिराः**—( हंसत ) भाऊ, ही म्हणत्ये कीं, माझं नांव बदला अगो-दर ! फारच पोरीनं गयावया केलीन् ! तेव्हां मग तिचं, काय नांव ठेवावं बरं !

**विश्वनाथः**—( साश्चर्य )–म्हणजे ? ही पुढं माझी बायको होणार आहे कीं काय ?

**एस. बाळकृष्णन्ः**—( उपरोधिक पण सहज ) अर्थात्च ! देव-दासींचा उद्धार, देवब्राह्मणांच्याच हस्तें झालेला बरा !

**इंदिराः**—तर मग हा विषय, आता इथंच पुरे ! मी तिचं नांव यमू असं ठेवलं आहे.

**एस्. बाळकृष्णन्ः**—हुं, पंत ! घ्या हें विचारांत ! कधीं कधीं एकाच ध्येयाच्या उपासनेसाठीं अतिशय विसदृश व्यक्तींनासुद्धां, एकत्र नांदावं लागतं ! कारण, विवाह हा जीवन–कलहाचा शेवट नसून कष्टाळू जीवनाचा तो केवळ आरंभच आहे, असं म्हणतात !

**विश्वनाथः**—बाळकृष्णपंत, ताई ! थांबा ! अशी कांही माझी थट्टा

करूं नका ! लग्नविषय केवळ पोरखेळ नव्हे ! पण मी आहें सध्यां भांबावलेला ! यह्मी नव्हे यमू, ही मी माझी बायको करून घेण्याच्या विचारापेक्षां, सध्यां मला तिच्या आईच्या प्रेताबाबतचा विचारच अधिक येऊन पडलाय ! आज एकसारखा मी दोन दिवस विचार करतोंय, कीं त्या प्रेताची नांवनिशाणी, म्युनिसिपल् ऑफिसच्या मृत्यूनोंदीत कां झाली नाहीं ?

**एस्. बाळकृष्णन्ः**—पण ती मेली, हें तरी निश्चित कशावरून ? कदाचित् बटोबाबरोबर ती कुठं तरी निघून जाण्याचाच संभव फार !

**विश्वनाथः**—काय असेल तें ईश्वर जाणे ! तथापि, उद्यां मी एवढ्या उत्सवाच्या जबाबदारींतून एकदांचा मोकळा झालों म्हणजे मग मला या बाबत तपास करायला ठीक पडेल !

**एस्. बाळकृष्णन्ः**—पण हा विषय इथं आमच्यामाथीं मारून, स्वतःच्या डोक्याला त्रास करून घेण्याची कांहींच जरूरी नाहीं ! मेल्या माणसांबद्दल विचार करण्यापेक्षां, जिवंत माणसांचाच परामर्ष घेतलेला बरा, नाहीं कां–? ( इंदिरेकडे सकौतुक पहात ) आम्हांला तर तुमच्यापेक्षां, ह्याच अधिक समजूतदार नि विचारी कार्यकर्त्या दिसल्या बुवा !

**इंदिराः**—यांत समजूतदारपणाचा किंवा विचारी कार्यकर्तेपणाचा मुळींच कांहीं संबंध नाहीं ! मनुष्यप्राणी हा परिस्थितीप्रमाणं वागत असतो ! कारण, प्रागतिक विचारांचा बुरखा घेऊन, त्यांत त्याच्या मनोभावना वावरत असतात ! मी आज कुंकू लावलं, एवढ्यानंच जर आपण मला विचारी कार्यकर्त्या म्हणत असाल, तर उद्यां कुंकवाचे कारखाने देखील जगद्‌गुरूंचीं व्यासपीठं म्हणून कार्यकर्ती व्हायला कांहीं हरकत दिसत नाहीं !

राग–**मिश्रकॉफी**. ताल–**तिताल**.

**नच धर्म-पीठावरी घाला ! धर्माचा हा क्रयविक्रय कां ?॥**
**लांछित गुरु-कुल मोक्ष-पदाला ॥ धृ० ॥ कुंकुम-तिलक,**
**भालीं नुरतां । सबला । मुकल्या । विधवा-बाला । भार**
**जगा कां झाला ? ॥ १ ॥**

**विश्वनाथः**—नाहीं पण ताई,–एकंदरींत " कुंकू " हा जिन्नसच

मोठा बाऊ म्हणून सर्वांना वाटत असतो ! कारण, समरांगणांतून पळून जाणारा वीर आणि लग्नाच्या बोहल्यापासून परत फिरणारा ब्रह्मचारी, हे नेहमीं लाल रंगाला फारच बिचकत असतात म्हणे !

**एस्. बाळकृष्णन्ः**—( मध्येंच ) आणि स्त्रिया तरी कुठं, कुंकवाशीं एकनिष्ठ राहातात ! अभिरुचि, स्वभाव, ध्येयं आणि हितसंबंध, इत्यादि प्रत्येक बाबतींत परस्परांचीं मतं जुळतीं असणारीं संसारीं दांपत्यं, कादंबऱ्याशिवाय तर इतरत्र आपल्याला मुळींच आढळून आलीं नाहींत !

**इंदिराः**—कशी येतील ? कारण, हिंदुसमाजांत सामान्यतः सर्व स्त्रियांनीं, लग्न केलींच पाहिजेत अशी सक्तीची प्रथा असल्यामुळं तर, कुंकवाच्या चालीसारखें कांहीं दोष उत्पन्न झाले आहेत !

**एस्. बाळकृष्णन्ः**—पण ते आहेत ना ! तेव्हां आमच्यामतें बायकांनीं जर कुंकूच लावायचं असेल, तर तें त्यांनीं आपल्या राज्यकर्त्याच्याच नांवानं लावलेलं बरं, नाहीं कां ? ! कारण सध्यां तरी नवऱ्याच्या दसपट, त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी, राज्यकर्त्यांवरच अधिक आहे !

**विश्वनाथः**—पण राज्यकर्त्यांना ही कुंकवाची उठाठेव नको असेल तर-?

**एस्. बाळकृष्णन्ः**—पुसून टाकावं ! त्यावर एवढा वादविवाद करून, रणं माजविण्यांत काय तात्पर्य आहे ? कारण,आदर्श हिंदु वैवाहिक जीवन हें पतिपत्नीच्या व्यक्तिविषयक आणि सामाजिक कर्तव्यावरच फार करून विशेष जोर देत असतं ! सारांश, विषयासक्तीचं, आत्मनिरपेक्ष प्रेमांत रूपांतर करायचं असतं ! आणि म्हणून तर प्रेमाला, त्यागाची आणि संयमसहिष्णुतेची अत्यंत जरूरी असत्ये ! बरं तर विश्वनाथराव ! तुम्ही आपलं स्नान वगैरे आटोपून, उत्सव-मंडपांत लवकरच या ! मी आतां पुढें होतों !

[ जाणार तोंच, यल्ली अर्ध्याअधिक भिजलेल्या लुगड्यानं घाबऱ्या घाबऱ्या येत्ये. ]

**यल्लीः**—ताईसाब, ताईसाब ! माजी आई माघल्या विहिरींत भूत व्हऊनश्यान फोवाया लागली बगा–!

**इंदिराः**—( साश्चर्य )–म्हणजे ? ! तूं सांगत्येस तरी काय हें ? चल पाहूं,–

**यल्ली**:—ऊः ! मी नाय येत फायला ! पवून पवून ती बेडकीवानी लई लठ्ठ झाली या ! मला ती भ्या दावील !

**विश्वनाथ**:—बाळकृष्णपंत, थांबा थोडें ! मीच स्वतः जाऊन काय आहे तें पाहून येतों–[ जाणार तोंच सी. आय्. डी. इन्स्पेक्टर पोलीसासह प्रवेश करतो. )

**सी. आय्. डी.**:—विश्वनाथ रंगनाथ कार्यकर्ते आपणच कां ? ( युवराजास पाहून. ) कोण अप्पासाहेब !–आणि ( साश्चर्य ) आपण–

[ विश्वनाथ व इंदिरा आश्चर्यचकित होतात. ]

**एस्. बाळकृष्णन्**:—होय, पण तुम्ही कां इकडे ?

**सी. आय्. डी.**:—( विश्वनाथाकडे पहात ) यांना अटक करण्याकरितां

**एस्. बाळकृष्णन्**:—कारण ?

**सी. आय्. डी.**:—यांच्यावर एका जोगतीणीचा खून केल्याचा आरोप आहे !

**एस्. बाळकृष्णन्**—( साश्चर्य ) होय ! ! पण याला पुरावा ?

**सी. आय्. डी.**:—मरणा अगोदर, मयतानं लिहून ठेवलेलं पत्र.

**एस्. बाळकृष्णन्**:—तें पत्र तुम्हांला मिळालं आहे ?

**सी. आय्. डी**:—होय !

**एस्. बाळकृष्णन्**:—काय आहे त्यांत मजकूर ?

**सी. आय्. डी**:—" माझ्या मुलीला नादीं लावून, विश्वनाथ रंगनाथ कार्यकर्ते, या इसमानं मला मिठाईतून विषप्रयोग केलेला असावा–! "

**विश्वनाथ**:—अरेरे ! कोण हा माझ्यावर भयंकर आरोप ! युवराज,–

**एस्. बाळकृष्णन्**:—थांबा ! असा धीर सोडून कसं चालेल ? ( यल्लीस उद्देशून ) बाळ, तुझ्या आईला लिहायला–वाचायला येत होतं, नाहीं–?

**यल्ली**:—नाय सरकार ! माज्या आईला जर लिवतां येत असतं, तर ती माघंच साहेबाची मड्डुम झाली असती, नव्हं ! मंग आतां भूत झाल्यावर जर कां ती शिकूनश्यान माझ्या म्होरं गेली आसल, तर त्या विहिरीं-

तल्या साती आसरा जानं ! पन जितंपनी तर या अंकलिपीला बी ती शिवलेली आठवत नाय !

**एस्. बाळकृष्णन्ः**—( विश्वनाथास ) बरं, तुमच्या जवळचं तें पठाणाचं असलेलं या पोरींचं बेचनपत्र कुठंय आहे, आणा पाहूं ! ( तो तें त्यास देतो. ) ( सी. आय्. डी. स बेचनपत्र दाखवीत. ) मयतानं लिहून ठेवलेल्या पत्रांतल्या अक्षरांत आणि या अक्षरांत कांहीं साम्य आहे कां ?

**सी. आय्. डीः**—होय ! अक्षरं सारखींच दिसतात,–

**एस्. बाळकृष्णन्ः**—होय ना ? तर मग आतां भिण्याचं प्रयोजन नाहीं ! कारण, हें अक्षर ज्या अर्थी त्या अक्षरासारखं हुबेहुब दिसतंय, त्या अर्थी हा सारा खेळ, आपल्या फरारी झालेल्या खुनी वडिलाचांच दिसतोय ! तेव्हां आपण अगोदर,–?–चला साहेबांच्याच भेटीला जाऊं या !

[ इंदिरा व यल्लीखेरीज करून सर्व जातात. ]

**इंदिराः**—यमू , चल ? लुगडं बदल पाहूं ? आपणहि आईला देवळातनं घेऊन, साहेबाकडं जाऊं या !

**यल्लीः**—पण किली तर आईसाबानं, आपल्या माळं बरोबर संगं नेलीया कीं–?

**इंदिराः**—नेऊं दे ! आपण नुसती कडी लावूनच घेऊं या ! आहे काय आपल्या घरांत ?–नि येणार आहे कोण चोर ? ( दोघीहि आंत जातात. )

[ **रंगभूमीकरतांः**—सीन ट्रान्स्फर होऊन श्री लक्ष्मी नारायणाचें मंदिर दिसतें. बटोबा सोन्याच्या उत्सव मूर्ती डाकू वेषांत चोरतो ! मूर्ती चोरल्यानंतर पुनः पूर्ववत् दृश्य होतें. ]

**बटोबाः**—( लपत छपत प्रवेश. ) कुठंय ? कुठंय ती माझा जन्माचा पिच्छा पुरविणारी हडळ ! एका जखीणीला मिठाईतून अस्सल कुसुंब्याचा अर्क खाऊं घालून, प्राणावर उलटणारीण ती जोगतीण,–( विकट हास्य) सरकारची साक्षीदारीण तर सपशेल खाऊन बसलोंय ? आतां राहतां राहिली,–[ पडद्यांतः–इंदा–अग ए इंदू ! विश्वनाथ–अरे ए विसू–? ]

ही जन्माची दावेदारीण ! इलाहि कंठस्नान घातल्याशिवाय, माझा पुढील मार्ग कसा मोकळा होईल ! ( बाजूला दडून उभा राहतो. )

**वारणाक्काः**—( प्रवेश करून ) म्हणजे ! हीं सगळीं पोरं, नुसती कडी लावून गेली आहेत तरी कुठं ! कुणीच कसं नाहीं घरांत ! कोण आहे ते तिकडं–!

**बटोबाः**—( खाकरत प्रवेश. ) कुणी नाहीं ! मी आपला घरचाच चोर आहे.

**वारणाक्काः**—( न्याहाळून ) कोण !–ओळखलं–! एक जन्माचा पाठ-पुरावा करणारा पापी मैंद–!–

**बटोबाः**—शिव्या देणं किंवा आता असं हें तळतळाटून बोलणं अगर दांत ओंठ खाणं, ह्यांचा तुला तुझा प्राण वाचवायला म्हणून काडीमात्र देखील कांहीं उपयोग होणार नाहीं ! परवांचा तो टांग्याचा प्रसंग,भर रस्त्यांत होतां; म्हणूनच माझ्या हातून त्या दिवशीं तूं वाचलीस–!

**वारणाक्काः**—( संतापून ) देवांच्या दागदागिन्यांचा चोर,–एक लुटारू,–!

**बटोबाः**—बस्स ! तुझं गालिप्रदान ऐकायला, किंवा मागच्या उखाळ्या–पाखाळ्या काढायला, मला आतां मुळींच सवड नाहीं ! अग, देवांच्या दागदागिन्यांचाच काय, पण हा पहा प्रत्यक्ष,–[ सोन्याच्या चोरून आणलेल्या श्री लक्ष्मी नारायणाच्या उत्सव–मूर्ती दाखवीत. ] देवांचाच मी आतां चोर झालों आहे ! आणि याला कारण, म्हणजे तूं आणि सध्यां तो वैकुंठ उत्सव पाहणारा तुझा दिवटा सुपुत्र नाहीं, कां !

**वारणाक्काः**—पितृधर्माचा आळ आलेल्या एका पातक्याला, आपल्या पोरांचा बळी घेण्याइतकी राक्षसी भूक आहे, हें मी जाणूनच आजवर अजून सावध आहे ! चिमणीच्या पोरांना पंख फुटल्यावर तिला जर एखाद्या बहिरी ससाण्यानं,–

**बटोबाः**—बहिरी ससाणा ! पण हा सगळ्यानांच गट्ट करून, आका-शांतल्या देवांचाहि पण बाप बनलाय ! आणि या देवस्थान पंचक्रोशींतले तर सारे दगडी देव, एक जात निर्ढावलेले बेरड, बदमाष पदरीं ठेवून,

फोडून तोडून टाकायला लावले आहेत ! मारे तुम्ही दोघेंहि मायलेंकरं, त्या म्हाताऱ्या साहेबाच्या कानीं लागून, माझ्या प्राणावर उठला आहांत, नाहीं ! ( विकट हास्य ) मी तर काय म्हणा, आतां गुन्हेगारीचा बापच बनत चाललोंय ! तेव्हां तुझं आतां असं हें नरडं दाबून प्राण घेतला ( तसं करीत ) तर देवाघरीं तुझ्या मुक्तीचा मालक म्हणूनच त्या चित्रगुप्ताला माझी नोंद करून ठेवावी लागेल ! चला, गेलीस अखेर हळदी-कुंकू उडवित ! तुझ्या पोराला परस्परच त्या पत्रानं फांसावर न्यायला, आतां या विहिरींतलं प्रेत, खूनाचा पुरावा म्हणून वर आलेलंच आहे ! राहतां राहिल्या त्या साळू मैना ! पाहूं या कोणत्या पिंजऱ्यांत येतात त्या! पण अगोदर " यः पलाय सजीवते "— !

[ बटोबानं मूर्ती घेऊन पोबारा केल्यावर, कर्नल इन्स्टीट् , एस्. बाळकृष्णन् , विश्वनाथ व दोन पोलीस येतात. ]

**कर्नल इन्स्टीट्**:—तरी पण आश्चर्य असं कीं, तें प्रेत इथं तुमच्याच विहिरींत येऊन पडलं कसं ! ( वारणाक्का आसन्नमरण पडलेली पाहून ) परंतु इथं हें काय–!

**विश्वनाथ**:—कोण आई ! आई ! ( माडीवर डोकं घेत ) साहेब, माझी आईच हो ! आई, ए आई–! अग ए आई,—

**वारणाक्का**:—( खोल आवाजांत ) बाळ, जन्मदात्यापासून तुम्ही दोघंहि सावध रहा ! पण अगोदर देवांना मात्र सांभळा बरं !

( प्राणोत्क्रमण. )

**विश्वनाथ**:—( रडत ) युवराज– ! युवराज ! आई देवरूप झाली हो ! गेलं, आज माझं चालतं बोलतं सगुण दैवत, मला सोडून निघून गेलं !

**एक वृद्ध ब्राह्मण**:—( रडत ओरडत प्रवेशून ) महाराज–महाराज ! आमची दाद घ्या ! देवस्थानच्या आसंमतांतल्या देवांच्या मूर्ती, कुणी तरी दुष्टानं फोडल्या असून गोमांस रक्ताचा सडा, पंचक्रोशींतल्या तमाम देवळांत केला आहे !

**सी आय्. डी:**—(घाबरत प्रवेशून) सरकार–सरकार! अनर्थ झाला! संस्थान देवस्थानच्या सोन्याच्या–उत्सव मूर्ती चोरीला गेल्या!

**कर्नेल इन्स्टीद्:**—काय! देवांच्या सोन्याच्या उत्सव–मूर्ती चोरीला गेल्या!

**एस्. बाळकृष्णन्:**—जायच्याच! न जातील तरच आतां आश्चर्य! सर, आमच्या पूर्वजांच्या डोळ्यांवर आलेली ही "सोन्याची धुंदी,–" हा "सोन्याचा धूर" पहा! आणि या धूरांत, उपासमारींतली खरी डोळे-फोड,–नव्हे डोकेफोड जर कुणाची होत असेल, तर ती ह्या "विश्वाचा–नाथ" बनण्याची धमक बाळगणाऱ्या, या सच्छील नि सुशिक्षित बेकार तरुणांचीच– !!

अंक दुसरा समाप्त

# अंक ३ रा.

—×—

## प्रवेश १ ला.

( स्थळः—कर्नल इन्स्टीद् यांचा बंगला. गूढ विचारांत कांहीं तत्त्वज्ञानाचीं पुस्तकें व अगोदर आलेला पत्रव्यवहार पहात आहे. तदनंतर संस्थान देवस्थानचा राजीनामा लिहित बसतात. )

**कर्नल इन्स्टीद्ः**—एकूण, अलिकडे बऱ्याच मूर्तींचा उच्छेद होत आहे तर ! ह्या मूर्तिभंजकांचा इतिहास पाहिला, म्हणजे मानवी मनाबद्दल तिरस्कारच उत्पन्न होतो ! तरी बरं, कीं जग आणि परमेश्वर ह्यांमधील संबंधांचं गूढ, अजून अज्ञात असं आहे ! ( कॉल बेल वाजवितो; तोंच सी. आय्. डी. इन्स्पेक्टर प्रवेश करतो ) तुम्ही आमचा हा राजीनामा आत्तांच्याआत्तां विधिमंडळांत नेऊन सादर करा. ( तो गेल्यावर ) पौर्वात्य शंकराचार्य आणि पाश्चात्य ब्रॅडले, ह्यांनीं आज्ञेयवादाचं जें शहाणपणाचं धोरण मान्य केलेलं आहे, तें केवळ ह्या वैचित्र्यपूर्ण विश्वामुळंच होय ! कारण, तें स्वयंपूर्ण नाहीं, तर तें दुसऱ्या कोणत्यातरी वस्तूवर अधिष्ठित आहे ! आणि ती वस्तू म्हणजे "ब्रह्मच" आहे ! म्हणजे विश्व आणि ब्रह्म, ह्यांचा संबंधदेखील अदृष्य असाच आहे ! अर्थात् ईश्वरानं प्रत्येक वस्तू निर्माण केली आणि त्याची प्रत्येक कृति चांगलीच वठली,- एवढं म्हटल्यानं हें देवधर्मसंस्थेचं कोडं कसं उलगडेल ? !

[ यल्ली शाळेतून इंदिरेसह प्रवेश करते. ]

**यल्लीः**—पपा ! पपा ! आज एक महिना व्हत आला, इथं एका साधूनं मायंदाळी मंडळी आपल्या नादीं लाविलीया नव्हं ?

**कर्नल इन्स्टीद्ः**—पण तुला हें कसं काय समजलं—बाळ ?

**यल्लीः**—पपा, मी साळंला जातावख्त त्यो साधुबाबा माझ्या मागंमागं याया करतुया ! आन् म्हनतुया काय, तर म्हनं मी माघल्या जल्मीं तुझा

नवरा व्हतो; पन आतां तुझा बा म्हूनच तुला मला पोसावीशी वाटतीया! तवा तूं आतां शाळा सोडूनश्यान माझ्याबरोबर रहा! मी तुला रोज बासुंदी पाजन! घेवाच्यान्! या इंदुताईस्नी इचारा व्होवं तर? म्हूनतर म्यां त्येस्नी हथं आनलं!

**कर्नल इन्स्टीटः**--( इंदिरेस ) तुम्ही त्याला पाह्यलंय?

**इंदिराः**—होय, साहेब! अलिकडे त्याचं प्रस्थ फारच कांहीं कांहीं लोकांनीं माजविलंय.

**कर्नल इन्स्टीटः**--पण तो साधू या संज्ञेला पात्र असावा, असं तुम्ही म्हणूं शकाल?

**इंदिराः**—तसं कांहींच निश्चित ठरवितां येईलसं वाटत नाहीं!

**कर्नल इन्स्टीटः**—तरी पण तो परमार्थातल्या कोणत्या सांप्रदायांत जमा होईल, असं आपल्याला वाटतं?

**इंदिराः**—साहेब! पारमार्थिक कोणत्याहि सांप्रदायाच्या ओबडधोबड मतांना सफाईदार स्वरूप देण्याचा खरा मार्ग म्हणजे, मानसिक दुराग्रह नष्ट करणं हा होय! परमेश्वराविषयींच्या कोणत्या मताबद्दल मनुष्य आग्रह धरतो, हे तो मनुष्य कोणत्या प्रकारचा आहे-त्या मनुष्याची मानसिक उन्नति कितपत झाली आहे,-यावरच सर्वस्वीं अवलंबून राहील! कारण, मनुष्याचा स्वभाव आणि शिक्षण, त्याचप्रमाणं त्याच्या सभोंतालचीं परिस्थिति, हीं बहुतांशानं त्याच्या धार्मिक मताचं स्वरूप निश्चित करीत असतें!

**कर्नल इन्स्टीट्**—खरं आहे! कारण, प्रत्येक मनुष्याला आपली भक्ती जडेल, अशाच देवतेची निवड करण्याचा आणि आपल्याला पटेल, तें मत मान्य करण्याचा हक्क आहे! आणि म्हणून तर हिंदूधर्मातल्या पारमार्थिक पाणपोईवर, वाटेल त्याला निरनिराळ्या वेषांत जाऊन, आपली तहान भागवितां येत्ये! जपी, तपी, संन्यासी, साधू, बैरागी-! झालं तर जोशी, पिंगळे, वाघे, वासुदेव, भुते वगैरे सगळेच "ईश्वराचे दास" म्हणून, हिंदूधर्मात भिक्षा मागत असतात!

**इंदिराः**—आणि त्यामुळंच तर सध्यां आमच्या धर्मात ऐतखाऊ लोकांचा भरणा फारच झालेला पाह्यला मिळतोय! तेव्हां मला तर तो

साधु अशाच कोटींतला असावा असं वाटतं ! कारण, तपःसामर्थ्याचं जें एक दिव्य तेज, त्याच्या मुखचर्येवर दिसायला पाहिजे तें तर मला मुदलांतच दिसत नाहीं ! उलट, मला तर तो एकाद्या भोंदूसारखा,–फार काय पण अट्टल गुन्हेगार बेरडाप्रमाणंच दिसतों !

**यह्ली:**—पपा, इंदूताईनं बराबर वळाखलं ! मला त्यो काल म्हनाला व्हता कीं, मी किमया करून, सोनच्या गोळंच्यागोळं तयार करतों ! शफथ ! अवो एक दोन गोळं, त्येनं आपली झोळी सोडूनश्यान् मला काढून बी दाविली व्हती नव्हं–!

**कर्नेल इन्स्टीद्:**—( साश्चर्य ) असं आहे ! तर मग त्या साधूच्या हालचालीवर आम्हांला फारच बारकाईनं नजर ठेवायला पाहिजे ! कारण, तुमच्या वडिलांचा–बटोबा पुजाऱ्याचा आम्ही आज तब्बल एक महिना-भर, एकसारखा तपास चालविला आहे; परंतु अद्याप आम्हांला त्याचा पत्ता लागत नाहीं ! काय करावं ! ( यह्लीस ) बेटा, तुला तो, बटोबा-सारखा दिसतो कां ?

**यह्ली:**—पपा, तें मी कसं वळखूं बगा ! हां–! आतां तुमी जर कां त्याची वाढलेली दाढी वारकाकडनं कमी केली, तर मंग मी बराबर हेरन !

**कर्नेल इन्स्टीद्:**—( हंसत ) फारच सोपा मार्ग, तुला हा समजला ! बरं पण, तुझा अभ्यास बरा आहे ना ? अजून तूं फार अशुद्ध बोलत्येस–! !

**यह्ली:**—पन पपा, इंदूताई तर म्हनत्ये कीं, तूं लई शुध लवकर मैनेवानी बोलाया लागलीस म्हून ?

**कर्नेल इन्स्टीद्:**—हां–लागलीस ! पण तुला अजून दादोबाचं लघु व्याकरण पाह्यचं आहे ! मग आमच्या रामचंद्र भिकाजी जोश्यांचे भाग, तुला कधीं येतील तें येवोत ! ऑल् राईट, बेटा ! आतां थोडं तूं कांहीं खाऊन घे ! जा आंत. ( यह्ली जाते. इंदिरेस ) बरं, आपली व्यवस्था आणि योगक्षेम ठीक आहे ना ?

**इंदिरा:**—होय, उत्तम आहे ! आपल्यासारखे गरीबांचे कनवाळू आणि युतराजांसारख्या मातब्बर परोपकारी थोर पुरुषांची कृपादृष्टी असल्यावर, आम्हांला न्यून तें कसलं भासणार ? साहेब, कृतज्ञतेला

शरीराचीं कातडींसुद्धां जिथं अपुरीं पडत असते, असं म्हणतात; तिथं वाणीनं उपकारकर्त्याची थोरवी कशी बरं वर्णन करतां येईल ! !

राग–भैरवी ताल–त्रिताल.

**उपकार–धर्म हा थोरा । धर्माधर्म हा भेद कशाला ? ! ॥ अंतरीं भाविक दानशूर ॥ धृ० ॥ बुद्धि न सुचवित । वाणी नुमटवित । तनु न पुरत, परि नाममात्र उपकार–धर्म ॥१॥**

**कर्नेल इन्स्टीद्**ः—( गहिंवरून ) तूर्त आपण उपकार आणि उपकाराची फेड ह्यांना ईश्वरावर सोपवूं ! कारण तोंच आपणां सर्वांचा सन्मार्गदर्शक आहे !

**इंदिरा**ः—केव्हांहि ! शिवाय, मुक्तात्मा हा नेहमीं जगाच्या कल्याणाविषयीं उदासीन नसतोंच ! साक्षात् मृत्युंजय महादेवानं देखील, त्रिभुवनाच्या संरक्षणार्थ हालाहल पचविलेलं आहे ! मग जीवनाच्या अत्युच्च भूमिकेवर, अनंत दुःखं सहन करून, त्यागपूर्वक मृत्यूला धैर्य देण्याचं सामर्थ्य, ईश्वर काय मनुष्यमात्रांत देणार नाहीं ! !

**कर्नेल इन्स्टीद्**ः—जरूर ! नाहीं मुळचंच तें तसं आहे ! कारण, सर्व चराचर सृष्टीला व्यापून, परमेश्वर " दशांगुल " उरला–अशी हिंदूतत्त्वज्ञानाची विचारसरणी आहे ! तो भूत–भृत आहे; परंतु भूतस्थ नाहीं ! परमेश्वरामध्यें जग असेल; परंतु जगामध्यें मात्र परमेश्वर सामावलेला नाहीं ! तर निसर्गाची नियमबद्धता, विश्वाचा व्यवस्थितपणा आणि उत्क्रांतीच्या प्रवाहाची संथ प्रगति.-ही सर्वज्ञ परमात्म्याचं सूत्रचालकत्वच सूचित करीत असतात ! आतां हेंच पहा ना कीं, राजे शारंगधररावनूनीं आपल्या पूर्वजांच्या पद्धतीनुरूप म्हणजे भक्तीनुरूप, आपल्या या संस्थान देवस्थानचं ट्रस्टडीड केलं,—परंतु सद्यःस्थितीला तर तें फार कडक असून, निव्वळ एकांगी असंच ठरलं आहे !

**इंदिरा**ः—निव्वळ, असंच कांहीं आतां आपल्याला म्हणतां येणार नाहीं ! कारण, लोकांची बुद्धिमत्ता, तात्कालिन वातावरण आणि गरजा, हीच प्रत्येक धर्माचं स्वरूप कायम ठरवीत असतात ! अर्थात् धार्मिक

प्रतिबंध हें थोडें फार कडक जरी असले तरीपण तें रूढीच्या आहारीं गेलेल्या लोकांकडूनच होय ! ज्या ज्या वेळीं कांहीं विशिष्ट धार्मिक बंधनां-नाहि, धण जेव्हां शास्त्रांत कांहीं आधार मिळत नाहीं, तेव्हां त्या त्या वेळीं रूढींचं प्राबल्य, हें मानवी मनावर एकाद्या दडपणाइतकंच येऊन पडत असतं !

**कर्नेल इन्स्टीद्:**—आणि म्हणून तर " शास्त्रात्‌रूढिर्बालियसि–" या वचनावर तुम्हां हिंदू लोकांचा फार चांगला विश्वास बसला आहे ! आम्हांला आनंद झाला कीं, तुम्ही बराच चांगला विचार आणि अभ्यास चालविला आहे ! मग आम्ही तुम्हांला आतां असं विचारतों कीं, गेल्या महिन्या-पूर्वी तुम्ही आम्हांला " मंदिर–प्रवेशाबाबत " जी नोटीस दिली होती, ती काय म्हणून ! विशिष्ठ रूढि, हीच एक धर्म जात ओळखण्याचं खरोखरीचं गमक आहे ! शिवाय, धार्मिक वचनं आणि रूढि, ह्या आपल्याला ओबडधोबड आणि खोट्या जरी दिसत असल्या, तरी पण तीं वचनं आणि त्या रूढि पाळल्यानं कित्येक जीवांना स्वास्थ्य लाभतं, ही गोष्ट आतां आपल्याला नाकबूल करतां येणार नाहीं–!

**इंदिरा:**—कबूल ! तरी पण हिंदू–विचारप्रवर्तकांनीं, मानव-वंशाच्या विवेकशून्य धर्मसंकराला उत्तेजन असंहि पण दिलेलंच नाहीं ! सकेशा ब्राह्मण स्त्रियांचा मंदिरप्रवेश, हा सगुणोपासनेला भ्रष्ठहि करूं शकत नाहीं; मग नष्ठ होण्याची तर धास्तीच नको ! किंवा त्यांना आतां सधन देवालयांत आपापल्या पुनर्लग्नांच्या मिरवणूकीहि पण काढायची इच्छा नाहीं ! तर हुकमत करणाऱ्या कायद्यापेक्षां, शिक्षा ठोठावणाऱ्या न्याया-धिशापेक्षां, संकोच करविणाऱ्या प्रेमापेक्षां–आपल्या अस्तित्वाविषयीं ज्याचे आपण ऋणी आहोंत अशा पित्यापेक्षां, आणि आपल्या सर्व आकांक्षांचा आधार जिच्या कृपाआशीर्वादावर अवलंबून आहे, अशा मातेपेक्षांहि " परमेश्वर,"–हो, परमेश्वर ! ही कल्पना वा भावना मनुष्य मात्रांत अधिक आहे ! आणि या कल्पनेचं सगुण–स्वरुप, जगाला ज्या देवळांतून दररोज पाह्यची तरी वाईट संवय आहे, तिथं त्या देवळांत आम्हांला जायची धर्माच्या नांवावर बंदी कां असावी ! देव सगुण ? कां निर्गुण ?

साकार कां निराकार ! तो सोन्या–चांदीचा कां दगडामातीचा ! हें निरर्थक नि शुष्क वाद करणं, वेदांत्याचं काम असेल ! परंतु अर्धवट धार्मिक आणि अधार्मिक लोक, सांप्रदायिक वचनांबद्दल भांडणं वाढवून, आपापसांत मत्सर साधतात; हेंहि पण आतां जगाला नाकबूल करतां येणार नाहीं !

**कर्नेल इन्स्टीद्**:—(गहींवरून)॥ कोण्याही जीवाचा न घडावा मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें॥ धर्माच्या विश्वव्यापी संघामध्यें अगदीं मूळच्या जंगली धर्मालासुद्धां स्थान आहेसं वाटतं; कारण, बाह्यतः भपकेदार फुलं असलीं तरी पण त्यांचीं मुळं चिखलांतच रुतलेलीं असतात ! आत्मानुभवाला अधिक महत्त्व प्राप्त होत असून, सांप्रदायिक वचनाना आतां लवकरच गौणत्व येणार आहे ! कारण, प्रत्येक विचारी धर्ममतानं, विषयलोलुप, लोभी आणि क्रोधांध लोकांना, आपापल्या दुर्गुणांपासून परावृत्त करून, सन्मार्गाला लावलेलें आहे ! तेव्हां अशा स्थितींत, तुम्हांला मंदिरप्रवेश रूढिनं अमान्य करावा ही गोष्ट विचार करण्यासारखी असून, हिंदूधर्माला हें एक मोठं लांछनच आहे ! ( विचार करून ) ऑफ कोर्स ! रनिंग सब्जेक्ट इज् एंडलेस ! न संपणारा हा विषय आहे ! पुन्हा आपण केव्हां-तरी बोलूं या ! तुम्ही आता घरीं चला आणि युवराजांना व तुमच्या बंधु-राजांना आम्ही बोलावलंय, म्हणून इकडे लवकर पाठवून द्या ! गुड डे. ( हंसत ) आय मीन नमस्कार ! [ इंदिरा " नमस्कार " म्हणून जात्ये. ] धर्माच्या परस्पर संबंधाविषयीं स्पष्ट विचार कसा करावा !–याच जणुंकाय हें शिक्षणच सध्यां आम्ही घेत आहोंत ! आणि तें आम्हांला राजे शारंग-धररावनूच्या पुण्याईनंच मिळण्याचं भाग्य लाभलंय ! परंतु आजपासून मात्र, ( सुस्कारा सोडून नकार दर्शवीत ) निरनिराळे धर्म, हें विसंवादी नसून तें सर्व परस्परांना पूरकच आहे, हें समजूनच आम्हांला आमचं ध्येय लवकर साध्य करून घ्यायलाच पाहिजे !

[ सी. आय्. डी. पत्रव्यवहार घेऊन प्रवेश करतो. ] कांहीं कमी-जास्त बातमी !

**सी. आय्. डी.**:—मूर्तीचा अद्याप शोध लागला नाहीं !

**कर्नेल इन्स्टीद्**:—बरं, इथं कोणी एक महान् साधू आला आहे !

**सी. आय्. डी.**:—अशी शहरांत वदंता आहे; पण मी तलास मात्र अद्याप केलेला नाहीं !

**कर्नेल इन्स्टीद्**:—ठीक आहे ! तर मग आतां स्पेशल ड्यूटि म्हणून तिथंच काम करा ! [ तो जातो. आलेलें टपाल पहात. ] जों जों हिंदु-धर्माचा आम्हांला अधिकच निकट परिचय होत चाललाय, तों तों अधिकच "या किंवा त्या" धर्ममतांमध्यें धैर्यशाली, सहिष्णु, आत्म-निरक्षेप प्रेम करणारीं आणि नवविचारप्रवर्तक माणसं निर्माण झालीं, ही समजूतच पार नष्ट होते !— [ एस्. बाळकृष्णन् व विश्वनाथ येतात. ]

या अप्पासाहेब ! बसा असे विश्वनाथराव ! ( ते बसतात ) तुम्हांला सांगण्याचं आमच्या अगदीं जिवावर आलं आहे, कीं तुम्ही सुशिक्षित बेकारांकरितां मागणी केलेल्या "अन्नछत्रं नि सदावर्तें" ह्याबाबतचं अन्नबिल संस्थानच्या विधिमंडळानं अव्यवहार्य म्हणून फेंटाळून दिलं ! ( पत्र दाखवीत ) सी धिस.

**एस्. बाळकृष्णन्**:—काय ! या बिलाचा परामर्ष संस्थानच्या विधि-मंडळानं, केराच्या टोपलींत फेकण्या इतक्या किंमतीचा घ्यावा अं ! लाखों रुपये किंमतीच्या सोन्याच्या उत्सवमूर्ती, सपशेल देवळांतून लंबायमान होतात; त्यांची किंमत कवड्यारेवड्यावारी उधळली जाते; आणि गुणी सुशिक्षित कलावंतांना मात्र देवाधर्माच्या नांवावर चाललेल्या अन्नसत्रांत आपत्कालीं देखील जेवायची मारामार पडावी अं ! अपात्रीं दानांतून निर्माण झालेलीं हीं पातकं कुठून आतां आम्हांला उन्नतीच्या औद्योगिक युगांत नेतील !

**विश्वनाथः**—साहेब ! सध्यां औद्योगिक युग सुरू झालं असून, थोड्याच दिवसांत याला, त्या युगाबरोबर येणाऱ्या संकटाशीं आम्हांला टक्कर द्यावयाची आहे ! कारण—

राग—तिलककामोद. ताल—त्रिताल.

**अखिल विश्व औद्योगिक युग-बल एक करित । भुवनीं श्रीमान् मान त्यांत ॥धृ०॥ अंत-काल भारतास । दारिद्र्यांत आत्म-घात ॥ १ ॥**

तेव्हां अशा स्थितींत एवढी साधी बाबहि, संस्थानच्या विधिमंडळांत, हास्यास्पद म्हणून फोल ठरविली जावी, ही तरी एक सुशिक्षितांच्या कसोटीची वेळच समजली पाहिजे !

**एस्. बाळकृष्णन्:**—कसोटीची वेळ ! कसली वेळ घेऊन बसला आहांत आतां ! विश्वनाथराव, वेळ ही येत नाहीं; तर तिला खेंचत माचतच आणावी लागते ! रत्नालंकारांत रांगणाऱ्या सोरटी सोमनाथावर चाल करण्याची वेळ, मूर्तिभंजक गझनीच्या महमूदानंच, आमच्या धार्मिक अंधश्रद्धेला तुडवून आणली आणि मूर्तीचा चेंदामेंदा करून, देवळांचे दरवाजे आपल्या दारूच्या कारखान्यावर उभारले ! पंढरीच्या विठोबाचं पीठ, आणि आई तुळजाभवानीची चटणी केल्यामुळं तर, श्रीशिवछत्र-पतींना, त्या अफजुल्ल्याचा कोथळा बाहेर काढावा लागला ! सर, विधर्मी-यांनीं आमच्या देव साधनांचा हव्वा तस्सा उपभोग घ्यावा, तरी देखील आम्ही "लंगड्या बाळकृष्णाच्या पायांत सोन्याचा वाळा," आणि "शंखाला चांदीची अडणी" घालण्याच्या घडीव प्रयत्नांत मरावं—अं—?

**कर्नल इन्स्टीट्:**—( शांतपणें ) धार्मिक पूजाविधि आणि देवस्थान संस्था, यांचें स्वरुप आज कसंहि जरी झालं असलं, तरी पण त्या शेंकडों वर्षांच्या अनुभवानं तयार झालेल्या आहेत हें विसरू नका ! कारण, जेव्हां जिज्ञासूनं आपल्या धर्मक्षेत्रांतील नानाविधि सांप्रदायिक मतांचं निरीक्षण केलं, तेव्हां त्यास तात्कालिन सांप्रदायावर, सांप्रदायिकांच्या समाजव्यवस्थेचा ठसा उमटला आहे, हें अप्पासाहेब, आपण जरा शांत चित्तानं विचार केला तर कळणार आहे.

**एस्. बाळकृष्णन्:**—सर ! आम्हांला स्वतःला मूर्तिपूजा जरी अमान्य असली, तरीपण आम्ही तिच्या विरुद्ध बोलत नाहीं ! आम्हांला सगुणोपासनाच हवी आहे ! आणि देवळांची संख्याहि पण आमच्या संस्थानांत घरोघर व्हावी, अशीच आमची इच्छा आहे ! आम्हांला देव हवे आहेत ! मात्र ते बादशाही थाटांतलें नकोत ! कायमच्या ठशांचीं "शिवलिंगं" नि "दत्तांच्या पादुका"—एवढींच आमच्या निर्गुण ब्रम्हाचीं सगुणप्रातिकं हीं रस्तोरस्ती,—नाक्यानाक्यावर जरी चर्चेस-मशिदींप्रमाणं दृष्टयमान् झालीं, तरी तीं आम्ही स्थापायला तयार आहोंत ! परंतु त्यांना

आम्ही सधन म्हणून, टोलेजंग सुवर्ण कळसाच्या इमारतींत कोंडून, भक्ती-मार्गावरील भाविकांची पिढीमात्र, नामशेष होऊं देणार नाहीं !

**कर्नेल इन्स्टीद्**:—विश्वव्यापी परम चैतन्याचीं वर्णनं,त्याच्या वास्तविक स्वरुपापेक्षां कितीहि जरी कमी पडत असलीं तरी परम चैतन्याच्या सत्यतेविषयीं, खऱ्या हिंदूला कधींहि शंका येणार नाहीं; कारण हिंदू अज्ञेयवादांत, परमेश्वराचं अस्तित्व, अव्यक्त म्हणूनच ठरविलं आहे.

**एस्. बाळकृष्णन्**:—बरोबर; दिव्यशक्तीच्या अगाधत्वा विषयीं, व्यक्त अभिप्रायापेक्षां मुग्धतेंतच अर्थगांभीर्य, अधिक जास्त असतं. सर, ग्रीक रोमन काळांतील अज्ञानदेवतांसाठीं उभारलेलीं स्थंडिलें, हीं केवळ दिव्यशक्तीच्या स्वरुपाविषयीं, मानवी अज्ञानच, व्यक्त करीत नाहीं कां ! मग तीं स्थंडिलं म्हणजे अदृष्टाचा शोध करतांना, मनुष्याला आलेल्या अपयशाचीं स्मारकं, आम्हीं कां समजूं नयेत ! आणि याच दृष्टीनं, जर आम्ही आमच्या, या सांप्रतच्या सधन देवालयांकडे पाहिलं, तर ऐश्वर्यांतल्या भावनेंत, गजांत लक्ष्मीचा खून करून, धर्मभ्रष्टांना हीं बुचाडण्यास आम्हीं अप्रत्यक्षरित्या त्यांना मदतच करीत आहों, असं नाहीं कां सिद्ध होत !

**कर्नेल इन्स्टीद्**:—परमेश्वराचं स्वरुप वर्णन करा, असा प्रश्न विचारला असतां, उपनिषदांतील द्रष्टा स्तब्ध बसला आणि जेव्हां त्याला उत्तर देण्याविषयीं अग्रह धरण्यांत आला, तेव्हां तो " शांतोऽय आत्मा " असं म्हणाला ! अप्पासाहेब, देव चैतन्य इतकं गूढ आहे, कीं तें उकलायला वाणी किंवा इतर साधनं लटकींच पडत असतात !

**एस्. बाळकृष्णन्**:—आणि म्हणूनच "अखिल भारतवर्षावर पसरलेलीं देवळें, मंदिरें आणि मठ हीं इतःपर केवळ प्रार्थनास्थानं किंवा पूजाविधींचीं स्थंडिलं बनून न राहतां, आध्यात्मिक बाबतींत हिंदूंना कर्तव्याचीं दिशा दाखविणारीं विद्यामंदिरं आणि नवविचारांचीं उगमस्थानं झालीं पाहिजेत. ! " असं जें गुरुवर्य प्रो. राधाकृष्णन् ह्यांचं सांगणं आहे, तेंच आम्हांला यावेळीं तंतोतंत आचरणांत आणावंसं वाटतं.

**कर्नेल इन्स्टीद्**:—खरं आहे ! तसं झालंच पाहिजे नाहीं करावंच

लागेल ! परंतु अप्पासाहेब ! उच्च दर्जाचं बौद्धिक आणि नैतिक, शिक्षण जनतेला मिळाल्याशिवाय, जुन्या कल्पनांचं उन्मूलन कसं करतां येईल !

**एस्. बाळकृष्णन्**:—सर, कां करतां येऊं नये बरं ! जनतेचा बौद्धिक दर्जा सुधारून, अखिल हिंदूसमाजाला आध्यात्मिकतेच्या उच्च भूमिकेवर नेण्याचा कळकळीचा पण व्यवस्थित प्रयत्न, अलिकडच्या काळांत, धर्माचार्य म्हणविणाऱ्या एखाद्या तरी महात्म्यानं केलेला आहे कां ! उलट जगद्गुरु म्हणविणारे तर, आपापल्या बलाबलाची परीक्षा पाहण्याकरितां म्हणून सध्यां कोर्टाच्या आवारांत गुंतले आहेत ! परमेश्वराची अत्युच्च कल्पना जनतेपुढं ठेवून, तिच्यांत कांहीं सुधारणा घडून येईल, अशारीतीनं नि चिकाटीनं या धर्म पुढाऱ्यांनीं कांहीं प्रयत्न करायला नकोत का !

**कर्नल इन्स्टीट्**:—होय ! कारण धार्मिक सुधारणा घडवून आणतांना, हिंदु पद्धतीचा कटाक्ष, हा नांव बदलण्यावर विशेष नसून, तो अंतरंग बदलण्यावरच आहे !

**एस्. बाळकृष्णन्**:—होय ना ! तर मग सर, आम्ही आता आपल्याला स्पष्टच विचारतों कीं, इथून पुढं आपण, आमच्या देवस्थानाबाबत काय विचार केला आहे ! देव, देव्हाऱ्यांत आतां मुळींच राहणार नाहींत, हें लक्षांत घेऊनच आम्हांला आपला स्पष्ट अभिप्राय हवा आहे !

**कर्नल इन्स्टीट्**:—( गहिंवरत ) अप्पासाहेब ! हिंदूधर्मीय तत्त्वज्ञान अनुभवाच्या भूमिकेवर उभारलेलं असून अनुभवांतच त्याची आतां परिसमाप्ति होणार आहे !

**एस्. बाळकृष्णन्**:—काय समजूं या बोलण्याचा अर्थ ! !

**कर्नल इन्स्टीट्**:—अप्पासाहेब ! ( पाठीवरून हात फिरवीत ) ज्ञान, उपासना आणि कर्म, हे ईश्वरोपासनेचे मुख्य मार्ग असून, आध्यात्मिक साक्षात्कार म्हणजेच मोक्ष आहे ! सदाचार–दुराचारांतच धर्माधर्माची उत्पत्ती असली, तरी पण वासना आणि आध्यात्मिक जीवन, ह्यांचा फार दाट संबंध असावा, असं हिंदुधर्म मानीत नाहीं ! आणि म्हणून तर " हिंदुधर्म हें एक प्रकारचं मत असण्यापेक्षां जीवनाचा खरा मार्गच आहे, कारण हिंदुधर्मानं मततंत्र किंवा पुराणमतवाद्यांचा हटवादीपणा, यांचें बेसुमार वाढलेलें तण, मन घट्ट करून समूळ उपटून टाकल नाहीं !

तर फाजील वाढ कापून काढण्यापेक्षां मूळांचा रस शोषून घ्यायचा, ही हिंदुधर्माची सुधारणा घडवून आणण्याची फार चांगलीच पद्धती आहे !"

**एस्. बाळकृष्णन्:**—सर, खरोखरीच आमचा हिंदूधर्म, म्हणजे निश्चित अशा विशिष्ठ धर्ममतामतांचा गलबला नसून, व्यापक आणि अनुभवांचा जणूकाय कुशलतेनं विणलेला हा एक सुंदर गोफच आहे ! आणि एतदर्थच तर, हिंदूधर्माच्या सबंध इतिहासांत, ज्ञानी आणि व्यवहार कुशल लोक, हे नवीन ध्येयांचा विकास करण्याच्या कामांत आणि नवीन नमुन्यांचे प्रयोग करण्याच्या बाबतींत सदैव गुंतलेलेच आढळून येतील !

**कर्नेल इन्स्टीट्:**—येतील आणि करतीलसुद्धां ! अप्पासाहेब, धार्मिक अनुभव घेणाऱ्यांची जशी मानासिक तयारी असेल, त्याप्रमाणें त्यांस अनुभव येत असतात ! कां कीं, परमेश्वराचीं निरनिराळीं वर्णनं, एकच-एक सत्य प्रतिपादन करीत असतात ! तेव्हां विश्वव्यापी ब्रह्माच्या सत्यते-विषयीं हिंदूंनीं कधींहि पण पोरकट शंका प्रदर्शित केलेल्या नाहींत ! कारण, परब्रह्माचं अनिर्वचनीयत्व "नेति" "नेति" शब्दांनीं उच्चारण्याचा मान, जन्मतः हिंदू रक्तालाच तेवढा फार चांगला मिळालेला आहे ! थोडक्यांत आमच्यासारखा विधर्मी मनुष्य, जेव्हां अंतर्बाह्य हांडा-मांसानं अस्सल हिंदु होईल, तेव्हांच मग हिंदूधर्मात ढवळाढवळ करण्याचा त्याला "धर्मसिद्ध" हक्क मिळेल ! अर्थात् आम्ही अगोदर उद्यां स्वतःचं हिंदूकरणविधि करून घेऊन, हिंदूधर्माच्या वैदिक धर्माची दीक्षा घेणार आहोंत !

**एस्. बाळकृष्णन्:**—सर ! सर ! खरंच कां हें ! अहाहा ! धन्य आहोंत आम्ही ! प्रत्येक मानवी प्राणी, प्रत्येक संघ आणि राष्ट्र,—ह्यांच्यांत कांहीं तरी आदरणीय असं वैशिष्ट्य असतं, ही आम्हां हिंदूलोकांची शुद्ध विचारसरणी हळुहळू मान्य होत जाणार तर ! बरं पण, सर ! आपण हिंदू धर्माचा स्वीकार केल्यानंतर पुढं काय करायचं ठरविलं आहे !

**कर्नेल इन्स्टीट्:**—प्रथम अगोदर आम्ही आमच्या या बंगल्याला, "वेदान्त हिंदू-धर्मपीठ," हें स्वरूप देणार ! विश्वनाथराव, तुम्ही आज-पासून आमचे जसे धर्मबंधू आहांत तसेंच लवकर आतां, मानलेले जांवई व्हा ! आणि तुमच्या माहितींतले कांहीं तत्त्वज्ञानाचे जर विद्यार्थी असतील,

तर त्यांना आमच्याकडे घेऊन या! आमच्या या बंगल्यांत उद्यां सूर्योदयापूर्वीच, सर्वांनीं स्नानसंध्या करून, गायित्री मंत्रांतल्या अर्घ्यप्रदानानं सूर्योपासना करायला पाहिजे! तेव्हां आमची अर्धी इस्टेट् (यल्ली येते तिला जवळ घेऊन) ये बाळ!—या आम्ही जवळ केलेल्या पोरक्या मुलीला दिली असून, हिला तुमच्या सुपूर्द करीत आहोंत! आणि बाकीची अर्धी मिळकत, वेदांत हिंदूधर्मपीठाला दिली असून, त्याची सर्व व्यवस्था, ट्रस्टी या नात्यानं तुम्हांला पहावी लागेल!

**एस्. बाळकृष्णन्ः**—(चिडत पण गहिंवरत) सर—सर! ही आपण आपलीच निरवानिरव करीत आहांत! आमच्या संस्थान देवस्थानचं काय केलं, तें सांगा ना!

**कर्नेल इन्स्टीद्ः**—अप्पासाहेब आपल्या संस्थान देवस्थानचा ट्रस्टी या नात्यानं असणारा, आम्ही आपला संबंध, मघांच "राजीनामा" देऊन, संस्थानच्या विधिमंडळाकडं पाठवून दिला आहे!

**एस्. बाळकृष्णन्ः**—(साश्चर्य) म्हणजे—! !—असं करायचं,—सर—कारण—!

**कर्नेल इन्स्टीद्ः**—(शांतपणें) कारण! कारण जर एकाच धर्ममतानं, इतरांचीं धर्म मतं शोषून घेतली, तर आम्हांला वाटतं कीं, जगाच्या विचार संपत्तीचं लवकरच "दिवाळं" निघेल!

**एस्. बाळकृष्णन्ः**—(गहिंवरून) सर, सुशिक्षितांचं अन्नबिल, संस्थानच्या विधिमंडळानं फेटाळून दिलं, म्हणून कां आपण आपल्या जागेचा आज राजीनामा निषेध म्हणून देऊन बसलांत—!

**कर्नेल इन्स्टीद्ः**—(धीरोदात्तपणें) आम्हां तिऱ्हाईताला तर निषेध करण्याचा मुळींच अधिकार नाहीं! परंतु, अप्पासाहेब! दोन अथवा तीन निरनिराळे धर्म जेव्हां असं अट्टाहासानं प्रतिपादन करतात कीं,—"आमच्या धर्मामध्येंच खरं तत्त्व आणि खरा दिव्यसंदेश सांठविलेला आहे—!—आणि याचा स्वीकार हाच एक स्वर्गाचा एकमेव असा मार्ग आहे; तेव्हांच मग वाद, अनिर्वार्य होतात! अशावादामध्यें एक धर्म दुसऱ्याला आपल्यावर केव्हांहि चढाई करूं देणार नाहीं!—आणि मग सबंध जग, रसातळाला जाईपर्यंत, कोणत्याहि पण धर्माला आपापलं

वर्चस्व, प्रस्थापित करतां येणार नाहीं "!—तेव्हां अप्पासाहेब! माफ करा! आतां अधिक हा विषय इथं वाढवून, चर्चा लांबवूं नका! इतःपर संस्थान देवस्थानच्या मुख्य जागेवर, आम्ही तुमचीच, आमच्या मार्फत योजना करीत आहोंत! चला तुम्ही आपली अधिकारसूत्रं, आत्तांच्या आत्तां, संस्थानच्या विधिमंडळांच्या सभासदांसमोर घेऊन, आम्हांला आमच्या जबाबदारींतून मुक्त करा! विश्वनाथराव, तुम्ही इथंच कांहीं वेळ थांबा! आम्ही लवकरच येतों! चला, अप्पासाहेब!

[ एस्. बाळकृष्णन् व कर्नल इन्स्टीट् जातात. ]

**यल्ली:**—(विश्वनाथास) पपा आज असं वायू झाल्यावानी काय बडबडत्यात वो! कां डोकं बिकं फिरलंया त्येचं! आन् अर्धी इस्टेट मला दिली म्हंजी काय केलं वो! इस्टट म्हणजे काय! ऑ! आन् तुमी बोलत नाय तें! कां पपाच्या वायूबरोबर तुमचीबी वाचा बंद पडलीया कां, वो! अवो, माज्याशीं तुमी आज बोलत नाय तें! का, कुना सवतीनं, तुमास्नी आज शेंदूर पाजलाया-!

**विश्वनाथ:**—अरेच्या! किती हें एकदम प्रश्न विचारत्येस! मला रावणासारखीं दहा तोंडं कां आहेत! आणि मला शेंदूर कोण पाजणार! साहेबांनीं मात्र माझी मुस्कटदाबी, पुरतीच केली आहे खरी! हें पहा यल्ले,-

**यल्ली:**—( अंगावर चवताळून ) हां! यल्ली म्हून नाय हाक मारायची बरं कां! घ्या माघारी हें नांव! मला यमू म्हना, यमना म्हना नाय तर जमना म्हना! पण आतां यल्ली नाय म्हून देनार हाँ! ( तोऱ्यानं ) मी आतां बंगल्यांत राहून शाळा शिकाया लागलीया! तवा इंदूताईनं ठेवलेलं माजं नांव, घ्यायाचं बरं कां! मंग घ्या तर लवकर! अर विश्वनाथराया, अक्ष्शी नव्या नवऱ्यावानी लई लाजतुयास कीर! यमू म्हटल्यानं मी काय तुमची बायको होनार हाय थोडीच! आवरा कीं! म्हना ना मला यमू!

**विश्वनाथ:**—( त्रासून ) बरं यमू! काय त्रास आहे शिंचा! हं, काय म्हणत्येस-!

**यल्ली:**—मी म्हनत्ये-!—साहेबांनीं मला अर्धी इस्टेट दिली, ती काय भानगड हाय? पन अगोदर इस्टेट म्हंजी काय तें बोला ना!

**विश्वनाथः**—इस्टेट म्हणजे मिळकत,-पैसा! साहेबांनीं तुला आपली मुलगी मानून, आपल्या जवळचा अर्धा पैसा तुला बक्षीस म्हणून दिला आहे!

**यमीः**—म्हंजी अर्ध्या पैशावर मुलगी मिळवून, साहेब आतां माज्या-बरोबरबी लगीन लावनार हायेती व्हय! बटोबा पुजारीबाबा तर, नुसतंच धेवाच्या धुपाटण्यांतलं तूप दावूनश्यान मला आपली नवी अस्तुरी कराया बघत व्हता! त्यामानानं मी साळंत जायाला लागल्यापासून माजा भाव लई चढाया लागलाया जनु! आन् कपाळाला आठ्या घालून असं तिरसटल्या कोल्ह्यावानी माझ्याकडं काय बगता! नग ब्वोडा! असं आंबल्यावानी तोंड करूं नका बगा! जरा वाईच हंसत बोला की-! इथं कौनबी नाय!

**विश्वनाथः**—तें मला दिसतं! पण तुझ्याशीं काय बोलावं, तेंच मला कळत नाहीं! शिवाय, तुला तर आतां एखाद्या टक्काऱ्या राघूसारखा कंठ फुटलेला आहे!

**यमीः**—खिल्लाऱ्या बैलावानी टक्काऱ्या राघूचीबी मंजुळ जात हाय जनु! आन् कंठ म्हंजी कंठ्यांतला कां वो!

**विश्वनाथः**—नाहीं! गवयांतल्या एका जातीचा! हें बघ तुला कांहीं सुद्धां कळत नाहीं! मूर्ख कोठली!। हें पहा यमू! अग आपले साहेब, फारच मोठे चांगले माणूस आहेत! चांगले श्रीमंत असून, त्यांना बायकामुलं मुळींच नाहींत! आणि म्हणून तर तें तुला आपली मुलगी म्हणून,—

**यमीः**—हां हां! म्हंजी साहेब मला दत्तक घेनार हायती व्हय—!

**विश्वनाथः**—होय! होय! जवळ जवळ तसंच. कळलं ना आतां!

**यमीः**—कळलं! आन् हें बी समजलं कीं, मानसांचं आईबाप मेलं, तरी पन दत्तकानं, दुसरं तिसरं मिळूनश्यान् सरतावख्त ती बी मरत्यात कां वो! पन कावो पोरं जशी दत्तक घेत्यात, तशी नवराबायको कधीं एकमेकांना दत्तक घेत्यात कां! म्हंजी असं साहेबांनीं मला आतां जशी वटींत दत्तक घेतलीया, तसं उद्यां मला कुनी बायको म्हून दत्तक घेईल कां वो!

म्हंजी असं इंदूताईनं मला काल सांगितलं व्हतं कीं, दत्तक जानं म्हनजे मांडीवर बसनं ! (हंसत) खरंच कां वो, मोठी मानसं एकमेकांना मांडीवर घेत्यात ! !

**विश्वनाथः**—(त्रासून) घेत असतील ! मला नाहीं माहीत !–आणि सध्यां तर तुला कोणी मांडीवर घेऊन, थोपटायला लागलं नाहीं ना ! कुठून ही ब्याद, साहेबांनीं माझ्या सुपूर्द केली, नकळे !

**यल्लीः**—सुपरत म्हंजी हवाली नव्हं ! काय म्हनालांत, मला साहेबांनीं, तुह्मास्नी दिली ! म्हंजी मी काय शेताची वांटणी हाय ! कां देवाच्या निवदाची कडाकणी हाय ! समद्यानांच आईजीच्या जीवावर, बायजी–होन्याचं येड हाय जनुं ! !

**विश्वनाथः**—अग नाहीं; तसं कांहीं नव्हे ! साहेबांनीं, मला तुझ्या पैशावर व्यवस्था पाह्यला म्हणून ठेवलं आहे !

**यल्लीः**—(समजूतदारपणानें) ठेवलं आसल ! माज्या पैशावर तुमास्नी साहेबांनीं ठेवलं आसल; पण माजीबी व्यवस्था तुमीच ठेवनार हांत ! कां कुनी दुसराच एखादा बुटल्येर तुमी मला पाहून देनार हांत–! !

**विश्वनाथः**—यमू ! मी तुला आतां स्पष्टच विचारतों कीं, तूं खरोखरीच कां माझ्याशीं लग्न करण्याचा विचार साहेबांपाशीं बोलून दाखविला आहेस !

**यल्लीः**—नाय बा ! आन् आई यल्लाई मेल्या बिगर, माज्या लग्नाची सोडचिठ्ठी, कोन वो तिच्याकडून घेनारा मरद हाय ! (रडकुंडीस येत) तुमास्नी साहेब काय म्हनाल्याती जनुं !

**विश्वनाथः**—हो ! ते मला तुझ्याशीं लग्न करून, घरजांवई व्हायला कांहींसं सांगतात–!

**यल्लीः**—(कपाळावर हात मारीत) अरं, देवा ! तर मंग मी साहेबांच्या बी पोटची हाय जनुं ! आईनं किती जनांचं संसारबाईलपना राखला, आई यल्लाम्माला ठावं ! पन मला मातुर आतां कोनाशीच म्होतूर लावूनश्यान् पाटाचा नवरा, वाजत गाजत थाटांत आनायचा नाय !

**विश्वनाथः**—(सहर्ष) खरंच कां तूं आतां लग्न करणार नाहींस !

**यल्लीः**—असं उतावळ्या नवऱ्यावानी, मला काय पुसतां ? बरंच दिसतां कीं–?

**विश्वनाथः**—तुझ्या गळ्याची शपथ ! साहेब, मघाशीं असं कांहींसं बरळून गेले खरं–!

**यल्लीः**—चला जा ! माजा गळा म्हणजे पानमळा हाय वाटतं, कीं ज्येनं बगावं, त्येनं माज्या गळ्यावरच डोळा ठेवावा ! म्हंजी मी काय केवड्यांतली नागिन हाय ? कां कुंजबनांतली काळी कोकिळा हाय ! पन कां वो, विश्वनाथराव ! मी आतां तुमास्नी एक इचारूं कां ? तुमाला कधीं माज्याशीं लगीन कराया वाटतं कां !

**विश्वनाथः**—तुला कसं काय वाटतं, नव्हे दिसतं–!

**यल्लीः**—आँ ! दिसतं तसं नसतं; म्हून तर मी आपली तुमास्नी पुसत्येया कीं–!

**विश्वनाथः**—तर मग सांगूंच आतां ! मला ही आपल्या लग्नाची कल्पनाच मुळीं पसंत नाहीं !

**यल्लीः**—आन् मला तरी तसं कुठं येड लागलंया तुमचं ! माजं येड म्हंजी दाबून शिकावं ? अगदीं म्हातारपनतक ! आन् मंग इंदूताईवानी शाळा मास्तरीण होऊनश्यान् संमद्या देवदासींच्या पोरींना शिकवत बसावं !

**विश्वनाथः**—( आनंदून ) अहाहा ! शाबास यमू ! परंतु हें पहा, देवदासींच्या पोरींना शाळा काढून, तूं शिकवित राहाण्यापेक्षां, थोडंसं शिक्षण घेऊन, ही "देवदासींची चाल"च जर बंद करण्याचा प्रयत्न करशील, तर देवदासी–सांप्रदाया बाबतचा हा लागलेला डाग, आपल्या हिंदूधर्माला उज्वल करण्यास तुझी फारच चांगली मदत होईल ! बरं, या कामीं तुला आतां, पैशाची कांहीं कमतरता आहे, असंहि पण मुळींच नाहीं ! तेव्हां, आतां तूं हाच विचार कायम करून, साहेबांना काय तें स्पष्ट सांग म्हणजे झालं !

**यल्लीः**—पन साहेबांचं प्रेम तुमच्यावर आसलं; आन् त्येनीं मला जर तुमच्याशीं लगीन कराया भाग पाडलं तर–!–मला आतां भाग।कार कळतूया–बरं कां–!

**विश्वनाथः**—अग, पण तें तसं करतील कसं ! शिवाय, तुझा माझा बाप, जवळ जवळ एकच पुरुष निघाला आहे, हें अद्याप कसं कुणाच्याच लक्षांत आलेलं नाहीं ! तुझ्या तरी आलं आहे कां लक्षांत !

**यल्ली:**—व्हय ! संमदं माज्या ध्येनांत आलंया ! पन कां वो, बाप एक असूनश्यान्, " आया " जर वायल्या-वायल्या निघाल्या, तरी बी पोरांची लगीनं नाय व्हनार !

**विश्वनाथः**—कशी होतील ! अग, भाऊ-बहिणीचं नातं, नाहीं कां होत ! तेव्हां, इंदूताई ही जशी माझी वडील बहीण, तशीच तूं माझी धाकटी बहीण, यमूताई समजलं !

**यल्ली:**—बाई-बाई-बाई ! काय ह्ये नात्याचं धागंदोरं हायेत ! कां सुतड्यागुतड्यातलं काळंबेरं हाय ! कसं पन अक्ष्षी खरं बोलूनश्यान् तूं माजं तोंड गोरंमोरं केलंस नव्हं ! तर मग माज्या या पाठच्या-नाय गांठच्या भाऊराया ! अरं माज्या दादा-उलुसा थांब हथं ! मी तुला थोडासा गरम चा करून, ग्वाड त्वांडानं तुला वाईच पाजत्ये...हं... ! [ हंसत हंसत आंत जाते. ]

**विश्वनाथः**—हो ! हो ! पाज कीं ! दोन वेळां तूं मला जीवदान दिल्यामुळं, तुझ्याच स्वरुपांत, मला माझं मातृ-दैवत हें केव्हांहि झालं, तरी पण मनींमानसीं राहाणारच !

राग-**मालकंस**, ताल-**झपताल**.

**दैवतांत मातृ-देव ! । मोक्ष-वंद्य हा ॥ ध्रृ० ॥ शिकवि शीलाच्या बोला । ममतेनें चुम्बी मुलां ॥ जन्म देई त्रि-गुणाला । मातृ-धर्म हा ॥ १ ॥ जननीच्या थोर पदां । पूज्या-सनीं बसवि तुला ॥ पुत्र-धर्म मान्य मला । विश्व-धर्म हा ॥ २ ॥**

# प्रवेश २ रा.

( स्थळः—रस्ता. बटोबा, बुवावेषांत गांजाची चिलीम झोंकत पण खालील भजन म्हणत प्रवेश करितो. )

बटोबा:—

भजन

॥ तुलसी मगन भय्यो । राम-गुण गायके । हरि गुण गायके ॥ प्रभू गुण गायके ॥ धृ० ॥ कोई खाये लड्डू पेढा । बरफी मंगायके ॥ साधु खाये रुखा सुखा, बभूत लगायके॥१॥

देखिये, यारो ! अगर वे सचमुच केहना हो तो, जीसिकी 'मांड-मरदन' मस्त हो-उसीने बस्स ! तुरंत भी बुवा बन जाईये ! श्रीकृष्णचंद्रजीका प्रसाद, रासक्रीडा करके, मंदरमें दबानेकी जिसे आदत हो, तो उन्हें तुरंतभी बुवा बन जाईये ! ( इकडे तिकडे पहात ) काय करावं ! चांगलं मराठी बोलतां येत असूनहि पण, सध्यां ती मला बोलायची चोरी झाली आहे पहा ! नाहीपेक्षां, या पत्करिलेल्या बुवाबाजीच्या कफनींत, लंगोटींत राहण्याइतकी तरी अब्रुची किंमत असत्ये किंवा नाहीं,—हें मी फार छान चांगलंच बोलून दाखविलं असतं ! शिवाय, तो भोळाप्रसाद तर, माझ्या-वर निहायत खूष झालेला दिसतोय ! अगदीं चिमटयाप्रमाणं, मांडीला मांडी नि शेंडीला कात्री लावून, " गुरुभक्ती " करायला पहातोय गुलाम ! [ पडद्यांतः—गुरुमहाराज, अबे वो महाराज ! ] छे ! छे ! या परमार्थाच्या फाफटपसाऱ्यांत लिंगभेद दडपून टाकतां येत नाहीं, म्हणून तर हीं असलीं बांडगुळं, बुवाबाजीच्या झोळींत पोरं समजून, आम्हांला दररोज खेळवावीं लागतात ! [ सी. आय्. डी. इन्स्पेक्टर वेषांतरित भोळा-प्रसादाचे वेषांत येतो. ] आव मेरे बच्चे ! ( आशीर्वाद व नमस्कार ) कल्याणरस्तु,—शांतिरस्तु,— !

भोळाप्रसादः—नहीं—नहीं—महाराज ! मैं तो तुमारे नामपर "धष्ट-पुष्टमस्तु, "—या ऐसा कोई तुमारे साथ कुस्ती करनेका कबी मौका मिले, तो वो बराबर साध्य करले,—ऐसा कुस्तीवाला वस्ताद बनना चाहता हूं !

**बटोबाः**—ठीक हैं ! साध्य हैं ! लेकीन मूढभगत, अबे गुरुकृपाकी भी उसे आवश्यकता हैं– ! बेटा, यह सत्य भूलना नहीं ! देवाधिदेव महादेवजीनें भी गुरुभक्ती की है ! बिदेही राजा जनक और विलासी श्रीकृष्णचंद्रजी परमात्मा, इन्होंने भी गुरुकृपा संपादन कर ली थी ! बेटा, गुरुबिना ग्यान नही !

**भोळाप्रसादः**—और भंग बिना ध्यान नही– !

**बटोबाः**—( घुस्सेमें ) अबे ध्यान हो, तो फिर गुरुजी किस कामका ?

**भोळाप्रसादः**—सिर्फ गांजा, चंडोल और भंग पिनेके कामका !

**बटोबाः**—क्या– ? यही मेरे नामका डंका, तुम सारे शहरमें बजाते हो – ?

**भोळाप्रसादः**—नहीं,–नहीं– ! गुरुजी, मैं तो वो बडी हंसीखुषीसे जगजाहीर करना चाहता हूं ! लेकीन, महाराज " गुरु " याने क्या ?

**बटोबाः**—अरे, गुरु याने 'गु'–'रु' ! खाली नाहक सर उठाता है ! "गु" याने गुणवान ! और "रु" याने रूपवान ! जब दोन्होंका संगम पुरा हो जाय, तब "गुरुक्षेत्र "शुरु होतें हैं !

**भोळाप्रसादः**—लेकीन, गुरुमहाराज ! यह तो सुनाईये, के फिर बुवाबाजी किसीको केहते हैं–? !

**बटोबाः**—बुवाबाजी इसीको केहते है, कीं जहाँ गुणवान–रूपवान लोंग, बाप और जीजीकी भी पर्वा न करके, संपूर्ण आत्मानंद बढानेकेलिये तदाकार महात्माओंकी बाजी यह गुरुबाजीकी नाम नशाणी हैं ! बेटा, गुरु दुनियामें हो,–या दुनियासे बिदा चुका हो–! उसीका अस्तित्व तो अमान्य करनाहि जरूर हैं ! क्योंकी, वो हरहमेश " ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या, "– यह वेदांतसूत्र मुखोद्गत करके जगमेंहि मरना चाहता हैं ! इसीलिये तो गुर्वास्त हुवा हैं ! गुरुने आपने भक्तोंके साथ, चाहे जैसा शरीरविलास करा, तोभी उसे भक्तीका नाम देना ! कारण, गुरु यह क्षणैक योगी है ! जैसा उसीका अस्तित्व नाममात्र, वैसा भी भक्तोंका काममात्र !

**भोळाप्रसादः**—और राजयोगी, कौनसे आदमी बनते हैं– ?

**बटोबाः**—अरे राजयोगी तो वह हो गये, के जैसे हमारे मच्छिन्द्रनाथ महाराज ! मगरमस्त किलोत्तला राणीका उन्माद, गृहिणी-पद देकर,

तमाम उतार दिया ! बस्स ! वही नाथ मेरा गुरु हैं ! इसीलिये तो मैं खुद राजयोगी केहलाता हूं ! और—

**भोळाप्रसादः**—ऐसा ! तो योगीराज–भोगी महाराज ! आपनेहि कही किलोतला राणी, या दासी,—

**बटोबाः**—अबे चूप ! मुझे फांसी दी, तो मैं यह न बतलावूं कीं, "स्त्री" याने एक नाममात्र मानव जात हैं,–या माया भोगकी खैरात हैं ! इसीवजे यह कहावत हैं, के " यत्रनार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः– ! जहां नारीकी पूजा हो,–वहां देवता प्रसन्न रहती हैं ! शंकरजीको आधा आधा तोला भंग और गांजा, सिर्फ एकहि बिल्वपत्रके साथ चढानेसे वे जैसे प्रसन्न होते हैं, वैसेभी नारीको कामोपचार करके सदा संतुष्ट रखना चाहिये ! क्यौं की, महादेवजी भी कभी कभी अर्धनारीनटेश्वर बनते हैं.

**भोळाप्रसादः**—तो महाराज ! क्या आपनेभी कभी अर्धनारीनटेश्वरकी भूमिका ली थी ? अरे, स्त्रीयोंके साथ रास-क्रिडा करनेमें कुछ फायदा हैं ?

**बटोबाः**—हां, बेशक हैं ! अरे, केवल स्त्री-पुरुष एकत्रित होनेसेहि ब्रह्मानंदकी लूट परमार्थके नामपर चाहे जिसे मिलती हैं ! और वह आत्मानुभव, इस संसारमें श्रीकृष्णभगवाननें पहिले बचपनमें लोगोंको करनेको सिखाया ! अव्वल मतितार्थ तो यह हैं, के मानवी तारुण्य ये परमार्थ मार्गपर बिलकुलहि नरम गरम करनेकी कोशीष, कोई भी न करे ! बेटा, भोळा ! मैंभी हरहमेश, अर्धनारी बनकर, स्त्रियोंकेसाथ रास-क्रिडा करतां हूं !

**भोळाप्रसादः**—(लाडांत येत) तो महाराज,--आप कृपाकरके मुझेभी एक दिन,—

**बटोबाः**—क्या ? तुम्हें रास-क्रिडा करनेकी इच्छा हैं ! बिलकुलहि ठीक । अच्छा, तो मैं हालहि तुझे उत्तम नारीरूप देकर,—

[ झोळींतून कांहीं अंगारा धुपारा काढूं लागतो. तोंच एकदोन सोन्याचे गोळे व कांहीं पत्रें खालीं पडतात ! बटोबा गोळे उचलूं लागतो. भोळाप्रसाद कांहीं पत्रें घेऊन, लपवून ठेवतो. ]

**भोळाप्रसादः**—नहीं-नहीं-गुरुजी, नारी तो आप बनो। मैं तो मर्दहि रहेना चाहता हूं!

**बटोबाः**—अब वह न होगा! मैं तो तुझे अब, नारदमुनीकी या पार्थकी दशा करनेका इरादा करतां हूं! बोल? मैं तुझे अब किस जातका स्त्रीरूप बना दूं? पद्मिणी, हस्तिणी, चित्रिणी या शंखिणी,—

**भोळाप्रसादः**—बस्स! बस्स! महाराज, अठी आनंद पायो! स्त्रीरूप लेकर, रासक्रीडा करना यह शिखंडीका काम हैं! जहान्नमें गई वो तुमारी रासक्रीडा! लेकीन, गुरुमहाराज! यह सुन्नेके गोले, कहाँसे चोरी करके लाये हैं!

**बटोबाः**—बेटा, मुझे चोरी करनेकीं बिलकुलहि जरूरत न हो! क्योंकी मैं एक सिद्धपुरुष हूं! और सिद्धपुरुष अपनी सिद्धतासे चाहे जो बनाते हैं! गोरखनाथजीनें तो पिशाब करतेहि आखा पहाड सुन्नेका कर दिया था! बेटा, भोळा! मैं उसीका भी शिष्य हूं! देख, तुझे जो यकीन हो, तो मैं अब यह सब पृथ्वी, सुन्नेमें डुबा दूं! तमाम कंकर, लंगर कर दूं! लेकीन किंतू यह हैं, कीं तमाम पृथ्वी साली चोरजारोंसे भर गई हैं!

**भोळाप्रसादः**—( एकीकडे ) सपशेलच चोरांच्या उलट्या ठोकतोय बेटा!-हाँ! बराबर हैं; परंतु महाराज! आप क्या किमया करके यह सुन्नेके गोले करते हैं-?

**बटोबाः**—"किमया और मंत्रतंत्र!" न जाने साला इसीका मायना क्या हो सकता हैं! बेटा, मैं एक ईश्वरभगत हूं! और मूढजनोंका उद्धार, यही मेरा अवतार कार्य हैं! खैर, भगत! मैं अब सायंसंध्या करनेके लिये, नदी किनारे जातां हूं! तुम जरा धुनी लगाकर,-चिलम धोकर,-मंदिरमें बैठ रहो—( जाऊं लागतो. )

**भोळाप्रसादः**—ठीक है! जैसी आपकी आग्या! परंतु गुरुमहाराज, जरा जलदी आना! आज दो चार भगत दर्शनकेलिये आनेवाले हैं! और वे नारीजातके बडे भागवान श्रीमंत भी हैं! उन्हें पुत्ररत्नका प्रसाद देना चाहिये!

**बटोबाः**—हां! देएंगे! बलके उन्हें पुत्रकामेष्टीका यज्ञ करना पडेगा!

महात्मा वसिष्ठ मुनीजीनेंभी राजा दशरथको पुत्ररत्न देनेकेलिये वो कीया था ! परंतु भोळा, तुम इस काममें साले बिलकुलहि नादान हो–?

**भोळाप्रसादः**—वो कैसा क्या महाराज—?

**बटोबाः**—नहीं तो क्या ? आज करीब एक महिना हुवा; परंतु एकही नारी गुरुदर्शन न पा सकी ? क्या, इस तुमारे नगरमें एकहि स्त्री गुरुभाव न जाननेवाली पैदा हुई हैं–? !

**भोळाप्रसादः**—हां ! हैं ! बहोतहि हैं ! परंतु गुरुजी ! आप, आपना भाव, जरा लोंगोको पेहले दिखलाना तो चाहिये ?

**बटोबाः**—बच्चे, वो कैसा क्या ? जरा तरकीब तो दे दीजिये.

**भोळाप्रसादः**—देखिये, गुरुजी ! कलसे आप, गोबर किचड खाया करो ! मैले–गंधेमें डुबा करो ! और बिलकुलहि नंगे बनकर सारे शहरमें घुमते रहो ! बस्स, मेरा विश्वास हैं, कीं तमाम औरतोलोंग आपके यहाँ आकर, आपकी सेवा दिलचाहे वैसी वे शुरू होगी ! लेकीन महाराज ! उसवख्त आप मुझे भुलना नहीं ! हां, याद रख्खो.

**बटोबाः**—वाहव्वारे शिष्य ! शाबास रे मेरे दोस्त ! अच्छा, तो तुम आजसे मेरेहि गुरु बन गये हो–हां ! ( हंसकर ) भला, तुमारे इस नगरमें इंदिराकरके कोई एक बालविधवा रेहती हैं–?

**भोळाप्रसादः**—( चपापून ) हां, महाराज ! उसे आपकी जरूरत ? क्या आप उसीके साथ पुनर्विवाह करना चाहते हो–?

**बटोबाः**—नहीं–! नहीं ! बेटा, मैं उसीकेसाथ, शादीका पुनर्विवाह नहीं कर सक्ता; क्यौं कीं, वो मेरी गये जल्मकी बेटी हैं ! परंतु उसीकी जो एक शिष्या है, वो मेरी औरत हैं–!

**भोळाप्रसादः**—गुरुजी–! उसीका नाम तो लिजीये !

**बटोबाः**—अरे वो तो अब मामुली एक देवदासी बन गई हैं ! छोड दो सालीको ! बडी निमकहराम अवलाद है ! उसीका नाम लेना भी बडा पाप है !

**भोळाप्रसादः**—और पापीओंका पापदेखनाभी सवाब हैं !

**बटोबाः**—अच्छा ! छोड दो यह विचार ! मैं अब सचैल स्नान करके जरा देरीसे मंदिरमें आतां हूं ! तुम चिराग बिराग लगाकर, सारा

इंतजाम ठाकठीक करके वहाँ बैठो! मैं अब्बीहि लौट आतां हूं! जय सिताराम! जय अलखनिरंजन! अलख-! [ जातो.

**भोळाप्रसाद:**—बेट्या, भरला रे भरला तुझ्या पापाचा घडा! आतां तुला अधिक वेळ असं जगांत वावरूं देणं, म्हणजे नाहीं त्याच पातकांची वाढ करण्यासारखं आहे! तेव्हां तुला अगोदर-! पण अगोदर याच्या ह्या पत्रांत,-( वाचतो. ) काय नीच राक्षस आहे पहा! आपल्या पोरीला वैश्यागारांत पळवून नेण्याची याची ही भाडखोरवृत्ती,-जाऊं द्या! अगोदर साहेबांच्या बंगल्यावर जाऊन, याला आज रात्रींच पकडला पाहिजे![जातो.

[ उलट बाजून एस्. बाळकृष्णन् व कर्नल् इन्स्टीट प्रवेश करितात. ]

**एस्. बाळकृष्णन्:**—( संतप्त निर्धारांत ) नाहीं, सर! आम्हांला ही विधिमंडळाची विचारसरणी मुळींच पसंत नाहीं! कारण, देवाच्या उत्सवमूर्ति चोरून नेणारा हा धेड होतां! कीं ब्राह्मण होतां! कां मुसलमान होतां! हें समजल्याशिवाय, आम्ही आमच्या देवस्थानची शुद्धी करायची कशी!!-आणि या प्रीत्यर्थ म्हणे, दोन अडीच हजारांचा चुराडा करा-!

**कर्नल इन्स्टीट्:**—अप्पासाहेब! हा सारा विचार श्रद्धेचा आहे! आणि आध्यात्मिक गोष्टींचं आकलन या शक्तीनंच होत असतं! तेव्हां श्रद्धा हा आत्म्याचा दिव्यचक्षु आहे!

**एस्. बाळकृष्णन्:**—कबूल! पण सर, सध्यां दुर्दैवानं अंधविश्वास म्हणजेच श्रद्धा, अशी दुष्ट समजूत रूढ होत चालली आहे! मनोमय प्रचीति, हाच जर श्रद्धेचा लाक्षणिक अर्थ केला, तर धर्म म्हणजे श्रद्धा किंवा अंत:स्फूर्तिहि होऊं शकेल! परंतु आध्यात्मिक आकलनहि पण इतर गोष्टींच्या आकलनाप्रमाणं,-थोडं फार चुकण्याचाच संभव, जास्त असतो! आणि म्हणून तर, तर्कशुद्ध विचारपद्धतीनं श्रद्धेला तावून सुलाखून घेण्याची आवश्यकता आज आलेली आहे! नुसत्या कवायती कर्मठ लोकांची अंधश्रद्धा, म्हणजे कांहीं धार्मिक वृत्ती नव्हे!

**कर्नल इन्स्टीट्:**—आपल्या आत्मिक विकासाच्या आड येणारीं बंधनं

तोडण्याची मानवी आत्म्यामध्यें अदृष्य शक्ती आहे, अशी हिंदुधर्माची अढळ श्रद्धा आहे !

**एस्. बाळकृष्णन्ः**—होय ना ! तर मग सर, देवस्थानाच्या शुद्धी-प्रीत्यर्थ आम्ही कपर्दिकाहि पण खर्च करूं इच्छित नाहीं ! तसंच, चोरीला गेलेल्या देवाच्या सोन्याच्या उत्सव मूर्ति सुद्धां आम्ही आतां लाख दीड लाख रुपये खर्चून, पुन्हा प्राणप्रतिष्ठीत करीत नाहीं ! आमच्या या घातुक अंधश्रद्धेचा फायदा घेऊन, विधर्मीयांनीं आणि स्वधर्मीयांनीं देखील, आजपर्यंत कितीतरी देवांच्या मूर्ति,–फोडल्या,–झोडल्या,–तोडल्या,–चोरल्या–तरी सुद्धां आम्ही इतके बावळट बनलों आहोंत कीं, पुन्हा आपलीं देवळें उभारून, त्यांची स्थापना करीतच आहोंत ! आम्ही मूर्ति बसविते भले आणि ते फोडते भले ! या फोडाझोडीच्या मामल्यांत, आमच्या सगुणोपासनेचा ऱ्हासच होत असलेला दिसून येईल !

**कर्नेल इन्स्टीद्ः**—हिंदूधर्म हा उदासीनतेला, सहिष्णुता मानीत नाहीं, तर आत्मोन्नतीच्या पायऱ्या ज्यांना एकदम चढतां येंत नाहीं, अशा निर्बुद्ध लोकांच्या हिताच्या दृष्टीनं, मूर्तिपूजेसारख्या, कमी महत्त्वाच्या साधनांकडे सोशीकदृष्टी ठेवूनच आपल्याला पाह्यला पाहिजे !

**एस्. बाळकृष्णन्ः**—सर, “ परमेश्वराचं स्वरूप आणि उपासना, याविषयीं विशिष्ट मत धारण करणाऱ्यांनाच मोक्ष मिळेल, अशा मर्यादित स्वरूपाची मोक्षाची योजना, आमचा हिंदूधर्म हा केव्हांहि मान्य करणार नाहीं ! कारण, असला एककल्लीपणा आणि अरेरावी, सर्वप्रेमी अशा विश्वव्यापी परमेश्वराशीं विसंगत आहे,– ” हें आम्ही पूर्णपणें जाणतों !

**कर्नेल इन्स्टीद्ः**—हें आपल्यालाच काय, पण अप्पासाहेब ! सर्वांनाच जाणायला पाहिजे ! कारण, जंगली मनुष्यसुद्धां आपापल्या धर्मभोळ्या समजूतींना श्रद्धेनं आणि अट्टाहासानं चिकटून राहातों ! त्यांच्या समजूतींना धक्का देणं, म्हणजे त्यांची नीतिमत्ता, त्यांच्या सामाजिक चालीरीति आणि मानसिक स्वास्थ्य, ह्यांना समूळ नष्ट करण्यासारखंच आहे ! तेव्हां, “ न बुद्धिभेदं जनयेद्ज्ञानां कर्मसंगिनाम् ”–या साईस्कर वचनावर विश्वास ठेवूनच, तुम्हांला तुमचं कार्य, फारच जपून करायला पाहिजे !

**एस्. बाळकृष्णन्ः**—सर ! आम्ही हात घालूं इच्छित असलेला विषय, " निर्बुद्ध लोकांची मूर्तिपूजा, "–हा नसून, " सधन देवालयें आणि सुशिक्षित बेकार, " हा आहे ! कोणत्याहि ईश्वरी सगुण प्रतीकाला,–त्याच्या भाविकाला,–अगर त्याच्या श्रद्धेला, आम्हांला यत्किंचित्‌हि पण नांवं ठेवण्याचा किंवा तीं समूळ उखडून टाकण्याचा अधिकार नाहीं ! आणि समजा, जरी तो असला, तरी पण तशाप्रकारचा हिरवटपणा, निदान आमच्या हातून तरी खास होणार नाहीं ! याचं कारण, म्हणजे आमचा स्वयंभू हिंदूधर्म, हा " एकेश्वर–अनेकेश्वर " पंथांनासुद्धां, पुत्र स्नेहातुराच्या प्रेमानंच पाहणारा आहे !

**कर्नल इन्स्टीद्ः**—निःसंशय ! आम्हां एकेश्वरवादी ज्यू लोकांचा परधर्म–असहिष्णुतेचा वृत्तांत मानवी इतिहासांत, रक्ताच्या अक्षरांनींच लिहिला गेला आहे ! अप्पासाहेब, धर्मवेडापासूनच धर्मयुद्धं निर्माण होत असतात !

**एस्. बाळकृष्णन्ः**—होय ! परंतु असलीं हीं धर्मयुद्धं करायची, आम्हां हिंदूंना मुळीं खोडच नाहीं ! सर, पॅलेस्टाइननं, पाश्चात्य–संस्कृतीला वळण देण्याऐवजीं, जर तें काम ग्रीक लोकांनीं केलं असतं, तर तें संस्कृतीच्या दृष्टीनं बरं झालं असतं कीं नाहीं, हें आतां आपल्यासारख्या विद्वान् यूरोपियन पंडितांनींच ठरवावयाचं आहे. इतस्ततः कांहींसें धर्म वेडेपणाचे स्फोट जरी कुठं थोडे फार झाले असले, तरी पण अश्रद्ध माणसांचा छळ, प्रोत्साहन देऊन कधींहि करावयाचा नाहीं, असा आमच्या विश्वव्यापी धिंदूधर्माचा मुख्य दंडकच आहे ! तेव्हां ही धर्माज्ञा पाळूनच आम्ही आतां आपली योजना, धर्मपीठांना कळविणार आहोंत.

**कर्नल इन्स्टीद्ः**—ती कशी काय ?

**एस्. बाळकृष्णन्ः**—चोरीला गेलेल्या सोन्याच्या उत्सव मूर्ति, इतःपर आम्ही पुन्हा लाख दीड लाख रुपये भांडवल गुंतवून मुळींच आतां बसविणार नाहीं ! मग देवस्थान संस्थानच्या मंदिर शुद्धीचा,–हा पाखळ पूजेचा पोरखेळ लक्षांत घ्याच कशाला ? म्हणे, भाविकांच्या दर्शनानं देव विटाळला म्हणून पाखळपूजेच्या सूपानं त्याला स्नान घालून शुद्ध करायचा ! किंवा चोरांनीं चोरून नेला, म्हणून देवळांच्या पुन्हा " उदकशांत्या "

करायच्या ! या असल्या कृत्याला आम्ही आतां साफ मदत करणार नाहीं ! सर, हा सगुणोपासनेचा अतिरेक फार फार झाला, नाहीं !

**कर्नल इन्स्टीदः**—नाहीं ! अप्पासाहेब, तसं म्हणतां येणार नाहीं ! कारण, जिथं अतिरेक फार फार झाला, असं आपल्याला वाटतं तिथं मुदलांत पाह्यलं, तर तत्त्वाबरहुकूम कांहींच नसतं ! आणि म्हणून तर, "यथा सांग तें कर्म कांहीं घडेना ! घडे कर्म तें पुण्यगांठी पडेना" असा शेरा देऊन, विश्वचिंती समर्थ रामदासाला सुद्धां या देवधर्म संस्थेबाबत मौन धरावं लागलं आहे !

**एस्. बाळकृष्णन्‌ः**—पण, सर ! विश्वचिंती महात्म्यांचं मौन, म्हणजे भावी पिढीला कार्यक्षम बनविणारा, तो संमतिदर्शक इषाराच होय ! अर्थात् एकंदर काल मानपरिस्थिती ओळखून, आम्हीं आपल्या देवस्थान संस्थानचीं सगळीं अन्नछत्रं नि सदावर्तें उद्यांपासूनच आमच्या सुशिक्षित बेकार बंधूंना सर्रास एकदम खुलीं केलीं आहेत ! अन्नार्थी पण विद्यार्थी आणि कार्यार्थी पण अन्नार्थी, ह्याव्यतिरिक्त इतरांना, आमच्या देवस्थानच्या अन्नछत्रांत, भोजनभाऊपणा गाजवायला इतःपर वाव राहणार नाहीं ! कार्यकर्त्या अन्नार्थ्यांना मात्र, आजपासून मुक्तद्वार आहे !

**कर्नल इन्स्टीदः**—पण आपद्धर्म म्हणून या गोष्टी जरी उद्यां मान्य केल्या; तरी पण ते आपले मुख्य देव,-त्यांचे ते उत्सव-समारंभ, ते त्यांचे मौल्यवान् अलंकार, हीं आपलीं सधन देवालयें,-

**एस्. बाळकृष्णन्‌ः**—त्यांचे ते सोन्याचे कळस !—वगैरे सर्व देवसाधनांचा उपयोग, आम्हीं आता सुशिक्षितांच्या बेकारी निवारणार्थच खर्च करण्याच्या विचारांत आहोंत ! सर, नुसत्या देवांच्या अलंकारांचीच रोख रक्कम किती येईल बरं—?!

**कर्नल इन्स्टीदः**—पृथ्वी मोलाचे अलंकार—?! त्यांची किंमत कोण करूं शकेल ?!

**एस्. बाळकृष्णन्‌ः**—पण तेच चोरीला गेले, म्हणजे मग आपण त्यांची किंमत कोरड्या हिशोबानं मुग गिळून हळहळ करीत गप्प बसतों, नाहीं ?! आणि जिथं पृथ्वीमोलाचें अलंकार ज्यांच्या देवधर्मसंस्थेंत निव्वळ पूजनीय म्हणून कुजतसडत पडलें आहेत, तिथं आमच्या संस्था-

नांतल्या ऐंशी लाख सुशिक्षितांनीं "हा अन्न" "हा अन्न"-" म्हणून प्राण सोडणं देखील, हें उद्यां आपल्या या देवधर्मसंस्थेला, अत्यंत लाजिरवाणं असंच नाहीं कां ठरणार ? सर, आपण आम्हांला बंडखोर आणि नास्तिक जर समजणार नसाल, तर आम्ही आपलें एक हृद्गत, आपल्याजवळ आत्तांच इथं बोलून दाखविण्याची परवानगी मागत आहोंत !

**कर्नल इन्स्टीद्**:—ती कोणती ?-अप्पासाहेब, स्पष्ट बोला पाहूं-!

**एस्. बाळकृष्णन्**:—सर ! कवि सम्राट् रवीन्द्रनाथ बाबूंचं "**शांतिनिकेतन**," आपण या आमच्या श्रीलक्ष्मीनारायणाच्या देवालयांत आहे या मूर्ती कायम ठेवून निर्माण करा म्हणजे मग आम्हीहि देवसाधनांचा उपयोग करून चालू औद्योगिक युगांत "सोन्याचा धूरच" काढीत राहूं ! सर, आम्ही आपली ही संकल्पित योजना आजच तारेनं श्रीमज्जगद्गुरूंच्या मान्यतेला आणि आशीर्वादाला आत्तां पाठविणार आहोंत !

**कर्नल इन्स्टीद्**:—जरूर ! जरूर ! तर मग अप्पासाहेब ! आम्ही सुद्धां हिंदूधर्माचे आचार्य म्हणून, त्यांचा आशीर्वाद तारेनं मागवून घेऊं! ठीक आहे ! आम्ही आतां त्याच तयारीला लागतों; आपणहि आपल्या तयारीला लवकर लागा पाहूं ! गुड् इव्हिनिंग ! ( जातो )

**एस्. बाळकृष्णन्**:—निम्याहून अधिक उपाशीं मरत असलेल्या बा चमत्कारिक जगता ! तुझ्याच कल्याणाकरितां म्हणून, आम्हांला आतां ही देवधर्मसंस्थेची "**देवलक्ष्मी**" कालसंकेतांतल्या परमेश्वरी इच्छेनं खर्च करून, तुला या कडुकाळांत जगवावयाचं आहे !-कोण विश्वास,-!

[ सी. आय्. डी. भोळाप्रसाद हा कांहीं नागचांफ्याचीं फुलं घेऊन प्रवेश करितो.]

**भोळाप्रसाद**:—( फुलं देत ) होय, महाराज ! सरकार, तो साधु म्हणजे,-तोच-तो हरामखोर; पाजी पुजारी—

**एस्. बाळकृष्णन्**:—कोण बटोबा ? !-तर मग तावडतोब तूं त्याला गिरफदार कां केला नाहीं ?

**भोळाप्रसाद**:—( पत्रं दाखवीत ) महाराज, तें मी आतां करणारच आहे ! परंतु हीं पत्रं पहा,—

**एस्. बाळकृष्णन्ः**—(वाचून)काय!माझ्या सच्छिल इंदिरेला–!(जीभ चावतो ) किती उलट्या काळजाचा नीच नराधम आहे पट्टा ! विश्वास, तूं आपली कामगिरी बजावून आम्हांला लवकर भेट ! जगद्गुरूंना तार करायची आहे ! जा, तुझं हें शेवटचं पण मुख्य काम आहे, असं समज. ( तो जातो. ) चला आपणहि आपल्या–कुठं आणि अगोदर कोणत्या कामगिरीला लागावं–? (विचार) प्रथम विश्वनाथ–इंदिरेला,– [पुन्हा जीभ चावतो ] फिरून तें तसलं एकेरी नांव, आम्ही अगदीं नकळत उच्चारून गेलोंच आँ ! तर मग आतां त्यांनाच प्रथम भेटून, आपली ही योजना साद्यंत कळविली पाहिजे ! [ जातो. ]

—:पडदा:—

**स्थळः**— [ नदी किनारा. बटोबा पुजारी बुवावेषांतच असून, लपत छपत व कांहींसा भीतीनं गडबडलेला पण देवि श्रीलक्ष्मीची सोन्याची मूर्ति घेऊन प्रवेश करितो. ]

**बटोबाः**—चला, भट्टी आतां चांगलीच पेटलेली आहे ! तेव्हां ही मूर्ति वितळवून, परत जाऊं या ! [ तो आंत जाऊं लागतो, तोंच हळूच पाठीमागून यल्ली ही रंगाची पिचकारी घेऊन प्रवेश करत्ये व त्याच्या पाठीवर पिचकारी मारून आपण उलट दिशेनं निघून जात्ये. ]

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळः**—विश्वनाथाचें घर ! सर्वसाधारण देवघराचें दृश्य ! इंदिरा खालील तुकारामाचा अभंग म्हणत, समई लावून देवापुढं ठेवित आहे.]

### अभंग.

इंदिराः—

**जेणें तुज झालें, रूप आणि नाम । पतित हें दैव, तुझे आम्ही ॥ धृ० ॥ नाहीं तरी तुज, कोण हें पुसतें ? । ' निरा-**

**कारी' तेथें, एकाएकीं ॥ २ ॥ अंधारें दीपिका आणियेली शोभा । माणकासि प्रभा, कोंदणाची ॥ ३ ॥ धन्वंतरी रोगें, आणिला उजेडा । सुखी काय चाडा, जाणावें तें ॥ ४ ॥ अमृतासि मोल, विषाचिये गुणें । पितळें तरी 'सोनें' उंच-नीच ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्ही असोनिया जाण । तुज "देवपण !" आणियेलें ॥ ६ ॥**

[ एस्. बाळकृष्णन् हा अभंग चालू असतांनाच येतो; परंतु लगेच मागं परतून सबंध अभंग ऐकून घेतो ! म्हणून पुरा झाल्यावर तो पुढं व्हायला आणि इंदिरेचाहि पण दृष्टिक्षेप व्हायला अगदीं एकच गांठ पडते ! ती अभंग गुणगुणतच राहते. ]

**एस्. बाळकृष्णन्**:—( पुढं होत ) म्हणा ! पुन्हा एकदां ऐकूं द्या आम्हाला तें देव-भक्तांच प्रेमळ भांडण ! "–परमेश्वर आम्हां मर्त्यजीवांची पारख करीत नसतो; तर आम्ही मरणाधिन माणसंच परमेश्वराची परीक्षा घेत असतो, हा साधुवर्य तुकारामाचा अभिप्राय यांत किती बहुमोल आहे, नाहीं ! !

**इंदिरा**:—हो ! देवधर्मसंस्थेच्या टाकाऊं अडगळींत ठेंचाळून दांत पडलेल्या या आपल्या फाजील परमार्थाला, तुकोबा महाराजांनीं हा अभंग करून चांगलाच पायबंद लावला आहे ! प्रत्यक्ष देवाचंच अस्तित्व हिरावून घेणारा भक्त–

**एस्. बाळकृष्णन्**:—( मध्येंच सुस्कारा सोडीत. ) जगाच्या दृष्टीनं "नास्तिक" या संज्ञेला पात्र होत असतो ! आम्ही देखील सध्यां याच विचारानं संत्रस्त झालों असून लवकरच परमेश्वराची परीक्षा पाहणार आहोंत. बरं पण विसूभाऊ आलेला दिसत नाहीं ?

**इंदिरा**:—नाहीं अद्याप ! येईलच आतां इतक्यांत–!

**एस्. बाळकृष्णन्**:—[ आपल्या हातांतील नागचांफ्यांच्या फुलांशीं हातानं खेळत ] या नागचांफ्यांच्या ह्या फुलांचा हा आकार आणि वासाची मधुरता, किती तरी छान असत्यें, नाहीं ?

**इंदिरा**:—बरोबर. फुलांच्या आवडीनिवडींत देखील, देवादिकांनींहि पण फारच बारकाईनं लक्ष पुरविलेलं दिसतं ! नाहींपेक्षां, आदि महागणपतीला लाल रंगाची—

**एस्. बाळकृष्णन्**:—( मध्येंच ) कार्यारंभीच शेवटचा रक्तवर्ण होऊं नये, म्हणून तीं वाह्यचीं असतात !

**इंदिरा**: —झालं तर महादेवाधिदेवाला पांढरा रंग—!

**एस्. बाळकृष्णन्**:—अहो, धोत्रा—कण्हेरीचीं फुलं देखील, आमच्या झाडून साऱ्या भोळया सांब—देवांना चालतात ! म्हणून तर दुसऱ्याच्या बागेंतलीं फुलं चोरण्याचं भाग्य, आमच्या सगुणोपासकांच्या नशिबीं येत असतं ! एरव्ही, त्यांची देवपूजा, सगुणोपासनेंत जमा होऊन साजून कशी दिसेल ! खरंच म्हणतों, आम्ही हें ! सांगा पाहूं ? लोणकढ्या तुपांतली फुलवात, एखाद्या भाविक—भक्तानं, अगदीं देवाला स्मरून, आपल्या साऱ्या उभ्या आयुष्यांत एकदां तरी चुकून कधीं देवापुढं लाविली आहे काय ! हिरवट रंगाच्या वाशाळया आणि घाण तूपावरच, वैदिक यज्ञकर्मांचीं "होमकुंड,"—हीं नेहमीं धडाडून पेटलेलीं असतात ! रक्ताच्या गुळण्या होत असलेल्या जीवाला देखील, तें तसलं घाण चमचाभर तूप, आम्हांला देण्याची दुर्बुद्धि, या कर्मकांडानं म्हणून सध्यां ठेवलेली नाहीं ! फार काय पण इन्दी—[ जीभ चावून दचकतो. ]

**इंदिरा**:—युवराज ! कांहीं वेळ स्तब्ध रहा ! आपलं मनःस्वास्थ्य आज—

**एस्. बाळकृष्णन्** :—( ओशाळत ) होय ! डोक्यांत कुठली तरी एक चळवळीची तळमळ—आणि हृदयांत खळबळ, सध्यां आमच्या सुरूं आहे खरी ! कुठं तरी बोलून, मन हलकं करावं, म्हणून आम्ही इथं विश्वनाथ असेल, अशा विचारानं आलों !—तों तुम्ही निर्गुण ब्रह्मांत,—या सगुण विश्वाला, आपल्या घरकुलवजा टीचभर देव्हाऱ्यांत मांडून, परमेश्वरी स्वरुपाला, "देवपण" देत होतां; इतकंच नव्हे, तर देवांना देखील मीपणापासून दूर राहण्याचा सदुपदेश करीत होतां !—तोंच आम्ही इथं आलों ! तुमचा आतांचा अभंग ऐकून आमचं मन तल्लीन झालं ! आणि जणुं काय हृदयांतल्या आत्यंतिक गूढवेदनेनं, आमची विचारप्रेरक कार्य-

शक्ति माफ करा !-पण आम्हांला मात्र तुमच्याच ह्या निष्पाप दृष्टींत दिसूं लागली-!

**इंदिरा:**—पण आपण सध्यां विकारी युवराजपणांत नसून, आतां विचारी महाराजेपणाच्या प्रभावळींत आहांत हें विसरूं नका ! युवराज, सकृद्दर्शनी घडलेल्या प्रसंगांत किंवा दृष्टिक्षेपांत, अगदीं हृदयांतल्या आत्यंतिक गूढवेदना अथवा संवेदना जरी कळत वा नकळत निर्माण झाल्या असल्या, तरी पण त्यांचा समावेश, विचाराच्या प्रेरक कार्यशक्तींत कधींहि पण होत नाहीं ! कारण, हृदय हें विकाराचं निवासस्थान आहे; विचाराचं नव्हे !

**एस्. बाळकृष्णन्:**—बुद्धिगम्य मानवांना प्रतीत होणारं ईश्वराचं मूळस्वरूप, देहस्वरूपाहूनहि भिन्न असणं, हें " शिवस्य हृदयं विष्णुः " या सिद्धांतानुरूप पटवून घ्यायला, आपल्याला आतां कांहींच अडचण पडणार नाहीं ! डोक्याचा अथवा हृदयाचा प्रश्न, सद्यःस्थितीला विचारांत घेतां येत नाहीं; याचं कारण, म्हणजे सध्यां तिला कार्यकर्त्याच्या हाताचा कर्ता आधार आहे ! हात कर्ते बनले कीं, डोक्यांत नि हृदयांत एकच विचार बनत असतात ! आम्हांला क्षमा करा; तसें कांहीं बनवाबनवीचे प्रकार, आम्हांला तुमच्यापुढं दाखवावयाचे नाहींत, किंवा वाणीनं उच्चारून, तुमच्या या सध्यांच्या व्रतस्थ पवित्र पेशाला, आम्हाला लाजवावयाची तर मुळींच इच्छा नाहीं ! कारण, प्रेमाच्या कानगोष्टी सांगून एखाद्या तरुणीला झुलवायला-झुकवायला-हवं तर फसवायला म्हणा; पण अद्याप आम्हीं त्यांत अनभ्यस्तच आहोंत ! सारांश, प्रियाराधन एकेरी नांवानं संबोधून पूर्ण करायला, तत्त्वतः एखाद्या मूर्तीची मुळीं जरूरी असल्ये, असं आम्हांला वाटतच नाहीं !

**इंदिरा:**—तोंडानं एकेरी बोलण्यापर्यंत आलांत-नाहीं तें कदाचित् स्वाधीन न राहिल्यामुळंहि पण, तें तसं बोलून गेलांत-! एका अर्थी ठीकच झालं. कारण, त्यामुळं कार्यकर्त्या तरुणाची अशी दृष्टी असणं, कांहीं वावगं नाहीं ! उलट हें अगदीं अपरिहार्यच आहे ! तथापि, हें जरी खरं असलं, तरीपण मी आपल्याला-मला संकोच वाटतो कीं, मी माझ्या विसूभाऊला जशी आत्मीयतेनं एकेरी नांवानं हांक मारून कांहीं

आशा करूं शकत्ये; तशी ती मला यावेळीं आपल्याला करतां येणं, अगदींच अशक्य असं होऊन बसलंय !

**एस्. बाळकृष्णन्ः**—( साश्चर्य ) म्हणजे ! ! आम्ही राजकुलांत जन्म घेतला हा आमचा मोठाच दोष तर नव्हेना ? मग आपल्याला संकोच कसला वाटतो ?

**इंदिराः**—म्हणजे, मी आपल्याला "प्रिया,–" "प्राणनाथ" "नाथ–" या दृष्टीनं पहातें, असाहि पण कांही ग्रह करून घ्यायचं कारण नाहीं–! तर आपण आमचे अन्नदाते आहांत !–आणि अन्नदात्यानं फक्त आमच्या सारख्यांच्या पोटापाण्याकडेच, प्रेमळ दृष्टीनं नेहमीं पहात राह्यला पाहिजे ! बाकींच्या सुखदुःखांची कल्पना, होतां होईल तो त्यांनीं करूं नयेच मुळीं !

**एस्. बाळकृष्णन्ः**—खुळ्या आहांत झालं ! अगदीं तुम्ही आम्हांला बेलाशक विसूअण्णा सारखंच एकेरी नांवानं संबोधित चला. बरं पण, आम्हांला तुमचा विवाह–वृत्तांत कळेल कां ? !–आम्हांला तो—

**इंदिराः**—( साश्चर्य ) काय ऐकावासा वाटतो–! !

**एस्. बाळकृष्णन्ः**—होय–? !

**इंदिराः**—( दीर्घश्वास सोडीत )–पण तो मला मात्र, फारसा सांगावासाच वाटत नाहीं ! हां, एवढं बरीक सांगूं शकते कीं, आचार–विचार पाहून, तरुण-तरुणींनीं केलेल्या विवाहांत,–वृत्तांता अगोदरचा प्रेम पत्र-व्यवहार किंवा प्रियाराधन यापैकीं कोणतीहि पण गोष्ट, मूलभूत म्हणून प्रथम झालेली नसत्ये ! "गुणी गुणं वेत्ति,–" या न्यायानं होणारं आकर्षणच जेव्हां आतां तरुणतरुणींत उत्पन्न होऊं लागेल, तेव्हां मग बाल,–प्रौढ अथवा विधवा विवाहादि लग्नाचे प्रश्न, समाजांत आपोआप सुटतील !

**एस्. बाळकृष्णन्ः**—सुटतील कां अधिक गुंतागुंतीचे होतील, तें आज आपल्याला कांहींच नक्की ठरवितां येईलसं वाटत नाहीं !–आणि आत्तांच्या तुमच्या या एकंदर संभाषणावरून तर, तुम्ही वानप्रस्थाश्रमाचं ध्येय ऊर्वरित जीवनाच्या उच्च प्रश्नाचं चिंतन, अशा एकलकोंड्या वृत्तींतल्या एकांत सेवनांत राहूनच करण्याचा निर्धार केलेला दिसतो, नाहीं–? !

**इंदिराः**—होय ! युवराज, आतां बरीक आपण माझ्या विचाराशीं अगदीं बंधुप्रेमा इतकेंच तादात्म्य झालांत ! युवराज,–माझ्या विवाह–वृत्तांतांत आनंद–हो आनंदच आहे ! कारण, खऱ्या कर्तृत्वशील तरुणाचाच हात, ब्रह्मदेवानं माझ्याहातीं दिला होता ! मी त्या आधारावर, अवघ्या दोनच वर्षं अवलंबून असेन–नसेन, तोंच–तोंच या आपल्या श्रीलक्ष्मीनारायणाच्या मंदिराकरितां,–( गहिंवरून मौन धरत्ये. )

**एस्. बाळकृष्णन्ः**—( साश्चर्य ) काय मंदिराकरितां ! मंदिर ! मंदिर ! ! डोकं भणाणून गेलंय, या विषयानं तर,—!

**इंदिराः**—पण या विषयानं तर माझ्या हृदयांत तळमळ, विचारांत खळबळ आणि हातानं चळवळ,–चाललेली आहे ! युवराज, दोन वर्षांपूर्वी झालेल्या आपल्या अस्पृश्य मंदिर प्रवेश सत्याग्रहांत, माझ्या आचार-विचाराचा धनि, आपल्या अस्पृश्य बांधवाकरितां धर्मादाय म्हणून देवा-ब्राह्मणांच्या हस्तें,–कीं ज्यांनीं मला तो अग्नि–ब्राह्मणांसमक्ष दिला होतां, त्यांच्याच हस्तें अकालीं मृत्यूमुखीं पडला ! आणि त्यांच्या कार्याची धूरा, आज माझ्याहातीं आली ! तेव्हां मग आपणच मला आतां सांगा कीं, अकालीं सोडून गेलेल्या माझ्या जन्माच्या सोबत्याचं राहिलेलं अपुरं कार्य, मला पुढं चालवून तें पुरं करायला नको कां ? !

[ विश्वनाथ प्रवेश करीत. ]

**विश्वनाथः**—कसलं कार्य –? ( युवराज व ताईला पहात ) म्हणजे–? साहेबांच्या संन्याशाश्रमाच्या सुरवातीबरोबर,–कुणाच्या तरी गृहस्थाश्रमाचा आरंभ होण्याच्या प्रारंभीची बोलणी अगर वाटाघाट चाललेली दिसत्येय, नाहीं कां ?

**एस्. बाळकृष्णन्ः**—छे ! छे ! यांचा विवाह वृत्तांत ऐकून घेत होतों आम्ही !

**विश्वनाथः**—अस्सं होय ! ( गत आठवण करीत ) बाकी, युवराज ! खरोखरीच आमचे मेव्हणे म्हणजे एक जगद्विख्यात् लोकनायक होण्याच्या लायकीचे होते ! ते जर आज हयात असते, तर कदाचित् या नाटकांत प्रमुख नायकाची भूमिका, नाटककारानं त्यानांच दिली असती; परंतु

अस्पृश्य मंदिर प्रवेश सत्याग्रहाला,रूढीनं पहिला म्होरक्या धर्माला तुडवून, यमधर्माला सुखासुखी दिला झालं !

**एस्. बाळकृष्णन्**:—पण धर्माकरितां वैयक्तिक मरण पत्करलेल्या धर्मात्म्याचं मरण, या जगांत त्याचं अस्तित्व जीवंत म्हणूनच हें असं मूर्तिमंत राहत असतं ! नाहींपेक्षां, आमच्या संस्थान देवस्थानला लागलेला हा सकेशा ब्राह्मण स्त्रियांच्या मंदिर प्रवेशाबाबतचा अन्याय आम्हांला यांचेकडून कसा कळतां बरं !

**विश्वनाथ**:—शिवाय, असं झाल्याशिवाय देवळांची इष्टानिष्टता तरी लोकांना आपल्या पटणार कशी ? कां ताई ! असंच ना ? बाकी, युवराज ! आमच्या ताईला मात्र, नोटीस देतांना फारच चांगला मुहूंत लाभलेला होतां,—

**इंदिरा**:—( मध्येंच ) तो कसा काय रे !

**विश्वनाथ**:—नाहीं तर काय ? अग, मंदिर प्रवेशाची तूं नोटीस दिल्याबरोबर, मुख्य देव–देवळांचंच उच्चाटण करायची वेळ, आज आपल्या सर्वांवर आली आहे ! ( आठवण ) हो,–बरी आठवण झाली ! युवराज, आपण आतां पुढं काय करायचं ठरविलं आहे ?

**एस्. बाळकृष्णन्**:—कशाचं–?

**विश्वनाथ**:—आपल्या या " सधन देवालयांचं ? "–आणि " सुशिक्षित बेकारांचं–! "

**एस्. बाळकृष्णन्**:—सधन देवालयांची विल्हेवाट, " शांति–निकेतना"सारखीं गुरुकुलं निर्माण करून, हिंदू तत्त्वज्ञानाचं उच्चज्ञान, वाटेल त्या मुमुक्षुला त्यांत घेण्याची सोय करण्यांत येईल ! आणि देवांचे अलंकार नि उपकरणं, इतःपर चोरापोरावारी जाऊं नये, म्हणूनच आम्ही आपल्या संस्थान देवस्थानचें मूल्यवान् जडजोखीम योग्य किंमतीला विकून त्यावर सुमारें पन्नास कोट रुपयापर्यंत भांडवल उभारणार ? आणि मग आमच्या या संस्थानांत सर्वप्रकारचे कारखाने सुरू करणार ! आमची खात्री आहे कीं, आज अन्नान्न करीत असलेला आमच्या संस्थानांतला एक एक सुशिक्षित बेकार, या आमच्या नवीन उपक्रमामुळं, तो उद्यां लाखांचा पोशिंदा म्हणूनच जगांत मिरवील ! अर्थात् हीच मालिका,

उद्यां ऐंशी लाख सुशिक्षित बेकारापर्यंत गेल्यावर,-बेकार ! बेकार !- बेकार हा शब्द, निदान आर्यावर्ताच्या शब्दकोशांत तरी कित्येक शतकं दिसायला नको आहे !

**इंदिराः**—पण मला वाटतं, अशानं देवधर्मसंस्थेवर आपण हा मूले कुठारच नाहीं कां करीत-!

**एस्. बाळकृष्णन्**:—देवधर्मसंस्थेवर मूलेःकुठार करण्याइतकी ताकद, जर आपणां दुबळ्या मानवांत असती, तर ती मूळ सृष्टीच्या उभारणीच्याचवेळीं, देवधर्माला नामशेष करती ! परंतु, सत्याच्या अनुभवांतच धर्माची उत्पत्ती असल्यानं, मूळ देवांचं स्वरूप, आतां भावनेंतच पाह्यला पाहिजे ! कारण, निर्बुद्ध लोकांचे देव, काष्टलोष्टादि वास्तूंत, तर ज्ञानी पुरुषांचा देव, आत्मस्वरूपांत ! कर्मयोग्यांना, तेजांत ! भावना प्रधान लोकांच्या हृदयांत ! अप्रबुद्ध लोकांना मूर्तींत !-आणि ज्ञानी लोकांना तर सर्वत्र परमेश्वर आढळून येतो !

**विश्वनाथः**—आणि म्हणून तर द्रष्टयांना परमेश्वराचं दर्शन मूर्तींत होत नसून तें त्यांना स्वतःच्या आत्म्यांतच होत असतं ! म्हटलंच आहे कीं,-॥ " **शिवमात्मानि पश्यंति प्रतिमासु न योगिनः** " ॥

**एस्. बाळकृष्णन्**:—परंतु आम्हांला मात्र सध्यां परमेश्वर, " हा अन्न " ! " हा अन्न ! " म्हणून तडफडणाऱ्या पस्तीस कोट लोकसंख्येतल्या तीसकोट लोकात दिसत आहे ! आणि म्हणून तर आज आम्ही कित्येकाच्या अदूरदृष्टीला, नास्तिक बंडखोर, असें दिसणार आहोंत ! तथापि, विश्वनाथराव ! एखाद्या मताचा स्वीकार, म्हणजे धर्माचा पुरस्कार नव्हें; हें लक्षात घेऊनच, " सधन देवालयांचा "-आणि " सुशिक्षित-बेकाराचा प्रश्न ? "-आम्ही देवसाधनाचा उपयोग करून श्रीमजगद्गुरूंच्या अनुज्ञेनं, आतां संपूर्णपणेंच सोडविणार आहोंत-!

**इंदिराः**—अवश्य ! युवराज, जरूर जरूर हा प्रश्न हातीं घेऊन सोडवा बरं ! मलासुद्धां माझ्या आईचे त्यादिवशीचे शब्द अजून आठवताहेत ! " देव-साधनांचा उपयोग जर पडत्याकाळीं करून घ्यायचा नाहीं तर तो केव्हां बरं ? होतं नव्हतं तें चोरापोरावारी गेलं ! आतां देवसाधनांवरच आपणां सर्वांची सारी भिस्त ! नाहीं पेक्षां, आहे-हेंहि साधन

हातचं निघून जाईल आणि मग कवड्या–रेवड्या करीत प्राण सोडायची पाळी येईल !–" सोन्याचा बाळकृष्ण चेंचतांनां, माझ्या आईनं दिलेला हा इषारा,—

**एस्. बाळकृष्णन्ः**—( मध्येंच ) सद्यःस्थितीचं द्योतक म्हणूनच सर्वांनीं मान्य करणं, अत्यंत अगत्याचं असं आहे ! एरव्ही, या अव्यवहार्य विषयाकडे लक्ष देण्याचं आम्हांला तरी काय कारण ? परंतु श्रीकृष्णाच्या स्यमंतक मण्याचं आस्तित्व पाहिलं, तर नुसतं सध्यां हरिविजयाच्या पोथींत ! कोहिनूर हिऱ्याची किंमत पहा, फक्त ती वाङ्मयांत ! सारांश, देवसाधनांच्या किंमतीचा मेळ पहावा, तो फक्त बोलण्यांत ! प्रत्यक्ष हातांत त्याचा आंकडा हा कधींच येत नाहीं ! मग प्रत्यक्ष कार्याला तो हातीं कुठून लागणार ? असो ! आम्ही हातीं घेतलेल्या या कार्याची कड, ज्यावेळीं आमच्या संस्थानांतल्या ८० लाख सुशिक्षित बेकारांना पोटभर अन्न नि लज्जारक्षणापुरतं जाडंभरडं वस्त्रप्रावरण मिळण्यास कारणीभूत होईल, तेव्हांच मग तिची उपयुक्तता अखिल भारतवर्षाला कळून येईल ! तोंपर्यंत आपण सर्वांनींच या विषयाच्या पूर्ततेकरितां कायावाचामनें करून झटणं, हें अगदीं सार्थ असंच ठरणार आहे !

**विश्वनाथः**—केव्हांहि ! तर मग युवराज, आपल्या या कार्याला आम्हीं दोघेंहि शेंवटपर्यंत आपले सहकारी म्हणून नीट लक्षपूर्वकच काम करीत जाऊं !

**एस्. बाळकृष्णन्ः**—वा ! तुम्हां दोघांचीच तर आतां आम्हांला फार जरूर आहे ! तुमच्यासारख्या उमद्या माणसांचं पाठबळ आम्हांला आतां हवं आहे ! ठीक आहे ! उदईक आतां आपल्या कार्याची विधायक योजना, आपण कायम केल्याप्रमाणं जाहीर करूं या ! आम्ही आत्तांच श्रीमज्जगद्गुरूंना, तारेनं हें सर्व कळविण्याची व्यवस्था करतों ! तुम्ही सकाळींच साहेबांच्या हिंदूकरणविधिला, अंमळ लवकरच उपस्थित व्हा !

[ गडबडीनें निघून जातो. ]

**विश्वनाथः**—( इंदिरेस ) हं कसं काय मग ताईसाहेब ? उद्यां–नुसतां साहेबांचा हिंदूकरणविधिच व्हायचा आहे, कां आणखी एकादा कांहीं आपला दुसरा निराळा शास्त्रसमंत धर्मविधि–

**इंदिराः**—वाटल्यास यमूचं नि तुझं लग्न उरकून घेऊं या !

**विश्वनाथः**—तें आमचं आम्ही काय तें, केव्हांनाच ठरवून मोकळे झालों आहोंत म्हणा ! यमू, सांगेलच तुला तें इत्यंभूत ! आणि मला वाटतं तिचं आता लग्न करण्यापेक्षा, धर्म-मुंजच लावलेली बरी ! नाहींतरी स्त्री-उपनयन आपल्या धर्मातलं सध्या बंदच आहे कीं नाही ? करूं या तर आपणच सुरूं ! पण अगोदर तुमचं काय ठरलं तें बोलना ?

**इंदिराः**—कशाचं ? माझ्या पुनर्लग्नाचं विचारतोस होय ?

**विश्वनाथः**—होय ! अग युवराजावर तुझं प्रेम आहे ना ?

**इंदिराः**—प्रे-म ! प्रेमाची बाधा, निदान या जन्मीं तरी मला आता कांहीं होण्याची भीति नाहीं ! भाऊ, युवराजावरच काय, पण माझं सर्वांवरच प्रेम आहे ! मात्र तुझ्या तरुण दृष्टीला जें दिसतं तें नव्हे हो ! समाजव्यवस्थेचा आत्मघात जर आपल्याला टाळायचा असेल, तर विविध-विवाहांच्या बाबतींत उच्च म्हणविणाऱ्या समाजातील तरुण-स्त्री पुरुषांनीं कांहीं लग्नाचे कडक निर्बंध, हें आवश्य पाळायलाच हवेत !

**विश्वनाथः**—अस्सं का ! तिरसट ताई आहेस झालं ! ठीक आहे ! बाकी ज्याच्या त्याच्या मनाचाच हा विचार आहे म्हणा !

**इंदिराः**—हो ! हें तर खरंच ! [ यल्ली येत्ये ] का ग, आलीस बाळ आणि ही हातांत रंगाची पिचकारी ग कशाला ?

**यल्लीः**—ताईसाब, पपा हथं आतां येनार हायेती ! त्येस्नी काय बातचित बोलायची हाय जनुं ?

**इंदिराः**—म्हणजे-? तुझ्या लग्नाबद्दलच ना ?

**यल्लीः**—ताईसाब ! मला नाय लगीन करावसं वाटत !

**इंदिराः**—कां ग-!

**यल्लीः**—त्ये मला काय इचारतासा ! तुमी आपल्या मनालाच इचारा कीं-!

**विश्वनाथः**—वा ! सुंदर उत्तर ! अग ताई ती आतां सुशिक्षित होऊन, देवदासी-प्रतिबंधक कायद्याचा प्रसार नि अम्मलबजावणी “ कु ” म्हणजे पृथ्वीदेवी बनून ती आपल्या समाजांत राहून करणार आहे !

**यल्ली**:—पन तो माजा, लांबचा वायदा हाय ! आजची खबर तर माजी न्यारीच हाय !

**इंदिरा**:—ती कोणती ग ?

**यल्ली**:—ताईसाब, म्यां आज त्या साधुबावाला, देवी–लक्ष्मीची सोन्याची मूर्ति भट्टींत घालून आटवतांना पाह्यलं नव्हं–!

**विश्वनाथ**:—( साश्चर्य ) केव्हां ! कुठं–!–

**यल्ली**: -- आतां इकत्यात् ! म्हून तर या पिचकारीनं मी त्येला रंगीत खूण करून आली या !

**विश्वनाथ**:—पण त्यानं तुला पाहिलं बिह्यलं नाहीं; अग पण—

**यल्ली**:—नाय ! गांजा पिऊन गडी तर्ररं झाला व्हता ! त्येचं नरडं धरून, कोंबड्यावानी कापला असतां तरीबी गडी नाय काय बोलतां !

**विश्वनाथ**:—अस्सं ! बरं पण तो सध्यां कुठं आहे ? तूं त्याला कुठं पाह्यलास ?

**यल्ली**:—मघांशीं मी बंगल्याच्या गच्चीवर उभी राहून नदीकडं पाहिलं, तर त्यो साधुबावा कांही तरी धुरकटत बसल्यावानी खेळत व्हता ! तवा मंग ही रंगाची पिचकारी घेतली भरून ! आन् मोटारीतनं हळूंच गेले नदीवर ! ड्रावरबी साक्षीला संग हाय कीं, माज्या बरोबर ! चल ! तुला दावत्ये बग.

**विश्वनाथ**:—म्हणजे–? तूं तशीच मोटारींतूनच कां इथं आली आहेस ? चल–चल पाहूं ! मी आतांच त्याचा पाठलाग करून, पोलीसांत वर्दी देतों ! [ इंदिरेस ] जाऊं ना ?

**इंदिरा**:—जा, कीं ! पण जेवायला यायला फारसा उशीर मात्र करूं नकोस ?

**विश्वनाथ**:—नाहीं ! आतां इतक्यांतच येतों ! चल, यमूताई !

**यल्ली**:—ताईसाब ! मी बी पपास्नी घेऊन, मोटारीतनं लवकर येत्ये, बरं कां ?

**इंदिरा**:—ये बरं !

**यल्ली**:—व्हय, जाते बरं ! [ विश्वनाथ व यल्ली जातात ]

**इंदिरा**:—[ पतिस्मरण करीत ] आज दोन वर्षांत तिकडची

आठवण, तिसऱ्यानदां झाली ! आणि आईची आठवण तर आतां कायमच जगांत कीर्तिरूपानं प्रत्यक्षांत दुमदुमणार ! कुलपूर्वजांच्या गजांत-लक्ष्मीचं स्मारक, म्हणजेच हें आपलं देवघर ! सर्वस्वाचा नाश होतो, परंतु पूर्वजांची पुण्याई, देवघर करून असल्यानं, अद्याप कुलजात-श्रेष्ठ-संस्कार-बल-क्षम, असा हा आपला पवित्र हिंदुधर्म, कीं ज्यांतील उच्च-तत्त्वांचा अनुभव घेण्याकरितां म्हणून, आज एका वृद्ध तत्त्वज्ञानी आंग्ल तापसाचं शुद्धीकरण पाह्यला मिळणार ! आणि ही दैवी पण विचित्र घटना, जर कधींकाळीं कुठं घडत असेल, तर ती या आपल्या देवघरांत आणि म्हणून तर कित्येक, क्षुद्रवृत्तींचे अजाण लोक, या देवसंस्थेला आपापसांतल्या भाऊबंदकीचा कायदेशीर बडगा दाखवून, कोर्टकचेऱ्यांतून देवांच्या मिरवणूकी काढायला जनाची नाहीं-पण नुसती मनाचीसुद्धां लाज बाळगीत नाहींत ! सासरीं दिरांच्या याच त्रासाला कंटाळून, मी माझ्या दुर्दैवी मातेचं-! [ समाधान वृत्तीनें सुस्कारा टाकते. ] हें माझं माहेर घर-नि त्यांतलं हें देवघर ! आज नुसतंच देवघर आहे-नि त्यांत देवहि आहेत. पण देवांतला ' सोन्याचा बाळकृष्ण ! ''-सोन्याचा बाळकृष्ण-! माझ्या आईचा सोन्याचा बाळकृष्ण, मला आता युवराजांच्या स्वरूपांत दिसूं लागला ! ते आजपासून किती तरी उपाशी जीवांचे " अन्नदाते देव " म्हणून ठरणार ! सर्वाभूति वावरणाऱ्या प्रेमळ जीवांनों, माझ्या आईचा हा सोन्याचा बाळकृष्ण, उद्यां आतां " सोन्याचा-धूर ! " च काढील, मग बेकारीचं दारिद्य गीत, देवापुढं रडगाणं म्हणून गाच कशाला ! !

राग—जीवनपुरी-ताल-त्रिताल.

**गोर-गरीब मग नुरे घरोघरीं। राव-रंक हा भेद अढळ। परि जिंकिति युवराज अमर करी। कांचनमय धूर दिसेल भूवरीं ॥ धृ० ॥ अभिनव-कृति अमोल व्यापारा। उद्यम-शीला, व्हाया पिढीला, भावें वंदित स्वकरीं ॥ १ ॥ गोर गरीब मग नुरे-॥**

[ पद झाल्यावर, ‘ जय अलख निरंजन ’ म्हणून एक मोडका-तोडका कंदील लावून वेषांतरित बटोबा दारूनं संपूर्ण झिंगलेल्या परिस्थितींत प्रवेश करतो. तें पाहून इंदिरा “ भाऊ भाऊ ” म्हणून हाका मारूं लागल्ये, तोंच बटोबा तिच्या पायावर धाडकन येऊन आदळतो. ]

**बटोबाः**—पोरी, माझं संरक्षण कर ! मला जीवदान दे ग !

**इंदिराः**—कोण ! देवांचा दलाल कीं, देवधर्मसंस्थेचा विध्वंसक दैत्य !

**बटोबाः**—काय वाटेल त्या शिव्या दे; पण अगोदर तूं माझ्याबरोबर—! अग मी तुला पटणाला—! अग बये, ते पठाण आतां माझा जीव घेतील ग !

**विश्वनाथः**—[ प्रवेश करीत. ] पठाण जीव घेतील ! कोण—!

**इंदिराः**—[ हंसत ] साधुसंत येति घरा ! प्रसिद्ध साधुराज—!

**विश्वनाथः**— आणि आपल्या देवघरांत !

**बटोबाः**—( अडखळत ) कधीं कधीं देवघरांतच फार चांगल्या पोरी दिसतात !

**विश्वनाथः**—[ लाथ उगारीत ] तुला अगोदर लाथ मारून, घराबाहेर काढला नाहीं—हा माझा पहिला गाढवपणा—

[सी. आय्. डी. इन्स्पेक्टर,पोलीसासह बेड्या घेऊन प्रवेश करितात. ]

**सी. आय्. डीः**—पण तोहि आपण करूं नका ! ( बटोबाला बेड्या घालतात ) विश्वनाथराव, हीं यांचीं एवढीं पत्रं वाचा—! ! ( इंदिरेस ) आपणहि पहा !

[ दोघेहि बहिणभाऊ पत्रें वाचूं लागतात. वडील आहे असें कळतांच तर, विश्वनाथ रागानें मनस्वी संतापू पहातो;

परंतु इंदिरा मात्र धीरोदत्त निश्चयी बनून,—राग आंवरीत— ]

**इंदिराः**—अरेरे, परमेश्वरा ! तुझं अमर्याद प्रेम, हें जर थोतांड नसेल, तर विश्वांतील यच्चयावत् व्यक्तींना खात्रीनं मुक्ती ही मिळालीच पाहिजे ! [ डोळे मिटून घेते. ]

**विश्वनाथः**—( संतापून ) मुक्ती ! ! इंदूताई, काय करूं ! ( इंदिरा डोळे उघडून त्याला सांवरित ) याला मुक्ती द्यायला परमेश्वरी कृपाच कशाला हवी ! ती मलाहि आतां इथं देतां येईल ! हरामखोरा, जन्म देण्यापलीकडे तुझ्याहातून असा काय पितृधर्म घडला, कीं तूं या आपल्या पोटच्या सच्छिल नि अनाथ कन्येला, वेश्यागारांत लोटण्यासाठीं म्हणून, हीं असलीं सैतानी पत्रं लिहिलीस ऑ ! ! ( अंगावर झेंप घेत ) चांडाळा,-पितृआज्ञेमुळं परशुरामानं आपल्या आईचा प्राण घेतला; परंतु तूं आमच्या आईचा प्राण घेऊनहि पण मला अद्याप तुझा मुडदा पाडता येऊं नये ऑं ! ताई-ताई-थांब !-( अंगावर धावूं पाहातो )

**इंदिराः**—हां, भाऊराया थांब ! असा विकारवश होऊं नकोस ! अरे, ज्याअर्थी जगांतील प्रत्येक मानवी प्राण्याची आत्मविकासाची भूमिका, दुसऱ्या सर्वांच्यापेक्षां भिन्न आहे, त्याअर्थी अतिशय पापी मनुष्याचा नाशहि पण, जगाच्या योजनेमध्यें उद्यां उणीवच निर्माण करील !

**विश्वनाथः**—ताई, कसलं नेभळट तत्त्वज्ञान सागत्येस ! अग, ज्यानं कधी आपल्या पोरांचा परामर्ष, आज उभ्या पंधरा वर्षांत चुकून एकदासुद्धा घेतला नाहीं, त्यानं आपल्या व्यसनाच्या पूर्ततेकरिता पोरी-बाळींच्या शीलावर निखारे ठेवायला उद्युक्त व्हावं, अं ! ताई-ताई हा आपला बाप म्हणावा कीं जगांतल्या झाडून साऱ्या पातकांचा पिता सम-जावा ! या असल्या नीचाचा विटाळदेखील नरकाला व्हावयाचा !

**इंदिराः**—पण नरकाची कल्पना आपण आधीं मानणं म्हणजे, ईश्वराचं अस्तित्व नसलेलं असं एखादं तरी स्थळ आहे, असं समजण्यासारखंच तें मूर्खपणाचं नाहीं, का ! भाऊराया, या स्त्री-बाल-हत्यारी प्राण्यावर, खबरदार जर आतां तूं रागावशील तर ! इन्स्पेक्टर साहेब, या आतां आपण ! पितृधर्माला तुडविणारं हें आमचं पातकी पितृप्रेम, आम्हांला परमेश्वरी स्वरुपाइतकंच पूज्य आहे ! कारण, " पितृदेवो भव " अशी आम्हांला आमच्या हिंदू धर्मान्तर्गत उपनिषदांतील शिकवण आहे ! न्या याना आमच्या दृष्टी समोरून.

**एस. बाळकृष्णन्ः**—[ यष्टीसह प्रवेश ] अगदीं थेट काळ्यापाण्या-

वरच पोंचवा ! वास्तविक, आम्ही याला फांशीच देणार होतों, परंतु अशानं याला आपल्या दुष्कृत्यांची जाणीव, चांगली राहणार नाहीं;– म्हणूनच याला कुजत सडत मरण देणं योग्य वाटतं ! घेऊन चला या ब्रह्मराक्षसाला !– [ जातो. ]

**यल्ली**:—कां, बाबा ? देवाच्या गुलाब पाण्याच्या पिचकाऱ्या मला मागं माराया, तुला लई ग्वाड वाटल्या व्हत्या नव्हं–? ( मागील कफनी-वरील रंगाच्या पिचकारीचा डाग दाखवीत ) ही बघ माजी शेवटची पिचकारी ! बस आतां तुझ्या पाठीचं धिरडं खात, काळ्या पाण्यावर ! आतां बघा कशी मुडद्याची वाचा बंद पडलीया ! अरे पाडलं कीं नाय तुजं पिंड या पोरीनं ! आँ, तुला आलं मरण मुडद्या, चल निघ ! [ शिपाई वगैरे बटोबाला नेतात. ] ईश्वनाथदादा, बाप तकडं आतां काळ्या पाण्यावर मेला, तरी बी या मिशा काढायच्या नाय बरं कां ?

[ **रंगभूमिकरितां**:—सीन ट्रॅन्स्फर होतो. स्थळ:–वेदांत हिंदूधर्मपीठ ! उत्थापनावर कर्नल इन्स्टीट् हे स्वामी ईश्वरानंद म्हणून बसले आहेत. शेजारीं, युवराज एस्. बाळकृष्णन् हे जगद्गुरूंची तार वाचीत आहेत. ]

**ईश्वरानंद**:—अप्पासाहेब, जगद्गुरूंची काय आज्ञा झाली आहे ?

**एस्. बाळकृष्णन्**:—सर, धर्मपीठानं आपल्या योजनेचं कौतुक केलं असून, श्रींनीं आपला अनेकोत्तम शुभाशीर्वाद साहेबांना कळविला आहे.

**ईश्वरानंद**:—" बौद्धिक खात्री आणि सत्याची जाणीव उत्पन्न करून, सहानुभूतीचं वातावरण निर्माण करणारा असाच हा आपला पवित्र हिंदू-धर्म आहे ! कारण, आपल्या धर्माशिवाय, दुसरा प्रत्येक धर्म निपटून काढण्याचा प्रयत्न करणं, हा एक धर्मातील बोल्शेव्हिझम्चा प्रकार, अद्याप आपल्या हिंदूधर्माला माहीत नाहीं ! सर्वांना एकाच धर्मात ओढून, त्यांचे ऐक्य घडवून आणण्याची हांव न बाळगतां, निरनिराळ्या धर्म-मतांचीं ध्येयं एकच आहेत, हें कळून आल्यानंतर जी एकी होईल, तिच्या-वरच सर्वांनीं जोर दिला पाहिजे !

**एस्. बाळकृष्णन्**:—तर मग आतां संन्याशानं स्थित–प्रज्ञ होऊन, आध्यात्मिक स्वातंत्र्य, मोक्ष मिळविणं,–हेंच आपलं ध्येय, आपण आम्हां

सर्वांना शिकवीत इथं मिळवा, म्हणजे हातीं आलेल्या या देवसाधनांचा उपयोग, करून इथून पुढं सर्व औद्योगिक बाजू सुधारून, या अखिल-भारतवर्षांत आम्हीहि " **सोन्याचा-धूर** ! "च काढीत राहूं !

**ईश्वरानंदः**—तथास्तु ! [ आशीर्वाद. ]

**सर्वजणः**— ॥ श्रीलक्ष्मीनारायणार्पणमस्तु ॥



## माझे नियोजित नाट्यग्रंथ !

काल्पनिक : **धर्मसंकल्प !**

विषय:–राजदंड व धर्मदंड.

**जुलमी जुलूम !**

विषय:–जित-जेते व अस्पृश्यता.

——×——

पौराणिक : **वर्णसंकर !**

विषय:–देवयानी.

**रावणशाही !**

विषय:–लंकाधिपति.

——×——

ऐतिहासिक : **श्रीवर्धनकर !**

विषय:–बाळाजी विश्वनाथ.

**राघोभरारी !**

विषय:–अटकेपार भगवा.

——×——

सामाजिक : **शरीरसंबंध !**

विषय:–जागतिक मिश्रविवाह.

**कला कीं शील ?**

विषय:–कुलीन स्त्रिया व रंगभूमि.

**बारा बलुते अथवा गांवगाडा !**

विषय:–ग्रामोद्धार व ग्रामसंघटण.

———